सुरसग्रंथमाला पुष्प ९५

# मदिरा-मस्तानी

आर्. एल्. भांगरे

प्रथमावृत्ति १९५१ ] [ किंमत २॥ रुपये

सुरसग्रंथमाला - पंढरपूर

: प्रकाशक व मालक :

**राजेंद्र रावजी शहा**

महाद्वार, पंढरपूर

  

: संचालक :

**नवजीवन गौतमचंद व्होरा**

केमिस्ट, सोलापूर

  

: मुखपृष्ठ :

**चित्रकार श्री. मुळगांवकर**

  



  

: मुद्रक :

**बा. भा. जोशी**

ज्ञानविलास प्रेस, पुणें २

# प्रस्तावना

श्री. आर. एल्. भांगरे यांचीं आतांपर्यंत दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. एक 'निर्वासित तरुणी' आणि दुसरें 'बैराग्याचा खून.' ह्या दोन्ही कादंबऱ्या सामाजिक स्वरूपाच्या असून त्यांत सामाजिक परिस्थितीचें वास्तववादी चित्रण त्यांनीं मोठ्या मार्मिकतेनें रेखाटलें आहे. प्रस्तुतची कादंबरी देखील सामाजिक स्वरूपाची असून लेखकानें दारूच्या पायीं व्यक्तीची, कुटुंबसंस्थेची व समाजसंस्थेची कशी हानि होते हें जनतेच्या निदर्शनास आणून दिलें आहे.

दारूबाजी हा एक सामाजिक रोग असून त्याचीं बीजें आपल्या समाजव्यवस्थेंतच आहेत ही गोष्ट महान् समाजशास्त्रज्ञांनीं देखील कबूल केली आहे. आर्थिक आपत्ति कोसळल्यानें, अन्य संकट ओढवल्यानें किंवा मनाला बसलेल्या धक्क्याने माणूस क्षणभर मनाला विरंगुळा मिळावा म्हणून दारू घेतो, पुढें त्याला दारू पिण्याची संवय जडते आणि तिचेंच रूपांतर व्यसनांत होतें. कांहींच्या बाबतींत केवळ चारचौघांच्या भिडेस्तव दारू घेतली, पुढें तिची चटक लागली आणि मनुष्य पूर्णपणें दारूच्या आहारीं जाऊन व्यसनाधीन बनला असें होतें.

दारूच्या व्यसनाचा व्याप फार विस्तृत आहे. तिच्या तावडींत केवळ शेतकरी, मजूर किंवा खालच्या पातळीवरील लोकच सांपडले नसून मध्यमवर्गीय पांढरपेशे देखील सांपडले आहेत आणि त्यांनीं आपल्या घरादारांची राखरांगोळी केली आहे हें आपणास कै. गडकऱ्यांच्या 'सुधाकरा' वरून दिसून येतें.

प्रस्तुतच्या कथानकांत एक प्रोफेसर दारूच्या आहारीं जाऊन आपणावर कसें संकट ओढवून घेतात याचें दिग्दर्शन करण्यांत आले आहे. प्रा. दौलतराव हे विद्वान् व कर्तबगार होते. त्यांचा विद्याव्यासंग फार मोठा. पण बरोबरीच्या चारचौघा स्नेह्यांच्या भिडेस्तव त्यांनीं दारूला स्पर्श केला! त्यांना दारूची चटक लागली. पुढें त्याचें व्यसनांत रूपांतर झालें. दारूच्या व्यसनाच्या अवस्था देखील क्षयरोगाच्या अवस्थांप्रमाणेंच असतात. पहिल्या

अवस्थेंत दारूबाजाला दारूची जरूरी असते. दुसऱ्या अवस्थेंत दारूबाजाला दारूची व दारूला दारूबाजाची आवश्यकता वाटते आणि तिसऱ्या अवस्थेंत तर दारूलाच जणुं दारूबाजाची आवश्यकता वाटूं लागते. मग काय विचारतां ! दारूबाज दारूच्या संपूर्ण आहारीं जातो. ह्या अवस्थेंतील व्यसन सुटणें हें तिसऱ्या अवस्थेंतील क्षयरोग बरा होण्याइतकेंच कठीण असतें.

दौलतराव दारूच्या आहारीं गेल्यावर त्याना स्वतःच्या योग्यतेचा, दर्जाचा देखील विसर पडला. सोनाजी जॉबर व त्याचे दारुडे मित्र यांच्या संगतींत दौलतराव दारूवर ताव मारूं लागले. या व्यसनामुळें दौलतरावांच्या घरांतील आनंद मावळला. त्यांच्या सुशील पत्नी सुनंदा यांनाहि जीवनांत वैफल्य वाटूं लागलें. त्यांनीं दौलतरावांना ताळ्यावर आणण्याचे आटोकाट प्रयत्न केले; पण व्यर्थ. शेवटीं दौलतराव इतके घसरत गेले कीं, सोनाजी जॉबरच्या अशिक्षित पत्नीला देखील त्यांना बजवावें लागलें. देवकी ही सोनाजीची पत्नी. तिला आपला पति सोनाजी व दौलतराव यांच्या दारूबाजीचा मनस्वी खेद होत असे. शेवटीं एके दिवशीं ती कळवळून दौलतरावांना म्हणाली, ' हें पहा साहेब, असं समदी रात दारू पिनं अन् मग झिंगूनशान घरीं जाणं तुमच्यासारख्यास्नी नाहीं शोभत तें ! तुम्ही साहेब लोक जरा इचार करा याचा. तुमच्या नादानं ह्योबी लागला लई चळायला, म्हून सांगतें, नका येत जाऊं इथं. दया करा गरिबावर ! घरीं तुम्हास्नी बी संसार आहे ! ! सोडा आतां ही अवदसा ! ! ! ' देवकीचे हे उद्गार किती अर्थपूर्ण आहेत ! पण हें सर्व पालथ्या घागरीवरील पाण्या-प्रमाणें होतें. दारूच्या पायीं दौलतरावांची नोकरी देखील सुटली !

पुढें मात्र दौलतरावांना डॉक्टर मित्राच्या उपाययोजनेची मात्रा लागूं पडली. दौलतरावांवर दारूबंदीवरील व्याख्यानांचा चांगला प्रभाव पडून त्यांनीं दारूचा त्याग केला. ते स्वतःच दारूबंदीचा प्रचार करूं लागले आणि शेवटीं पुनः मिळणारी कॉलेजची नोकरी न स्वीकारतां दारूबंदी प्रचार अधिकारी व्हायचें त्यांनीं पत्करलें. एवढेंच नाहीं तर दौलतरावांनीं सोनाजीची दारू सोडवून देवकीचा देखील दुवा घेतला.

नुकतेंच १ एप्रिल १९५० पासून आपल्या मुंबई घटकराज्यांत सरकारनें दारूबंदी केली आहे. सरकारी कायद्याची पारिणामकारक अंमलबजावणी होणें जरूर असून त्याला जनतेचा पाठिंबा देखील हवा. त्याशिवाय दारूबंदी यशस्वी कशी होईल ? कोठल्याहि रोगाचें मूळ शोधून त्याचे संपूर्ण निदान करून जालीम उपाययोजना केली तरच तो समूळ नष्ट होण्याची आशा. दारूबंदी-चेंहि असेंच आहे. दारूबंदी कायद्याच्या जोडीला सामाजिक दुरवस्था नाहींशी करण्याचें कार्य देखील हातीं घेतलें गेलें आणि जनतेचें सहकार्य मिळालें तरच दारूबंदी संपूर्णपणें यशस्वी होऊं शकेल.

प्रस्तुतच्या लेखकानें आपले विचार कथानकाच्या रूपानें मांडले आहेत. सदहू लेखकाला जिल्हा दारूबंदी समितीतर्फे १९४९साली त्यांच्या 'पश्चात्ताप' ह्या लघुकथेबद्दल अबकारी मंत्रि ना. ल. मा. पाटील यांचे हस्तें **पहिलें पारितोषिक** मिळालें आहे. त्यांची ही कादंबरी देखील लोकप्रिय होऊन सरकारच्या दारूबंदी कार्याला हातभार लावील अशी आशा वाटते.

तळोदें, प. खा.
दि. ५ जून १९५०

**प्रा. गोरखनाथ महाजन**, एम्. ए.
छत्रपति शिवाजी कॉलेज, सातारा.



# आभार

दारूबंदीवरील ही माझी कादंबरी जनताजनार्दनाच्या सेवेला मी अत्यादरपूर्वक सादर करीत आहें. प्रा. गोरखनाथ महाजन एम्. ए. सातारा, यांनीं हिचें हस्तलिखित आपुलकीनं वाचून यथायोग्य सूचना केल्या व स्वतःचीं इतर कामें बाजूला ठेऊन आस्थेनं प्रस्तावना लिहून दिली, त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होणार आहेत. त्यांची गांठ पडली नसती व हस्तलिखित त्यांचे हातीं गेले नसतें तर हा प्रसिद्धीचा योगहि कदाचित आला नसता.

वर्ष दीड वर्षापूर्वी लिहिलेले हें कथानक सरकारतर्फे प्रसिद्ध व्हावें अशी माझी मूळ मनीषा होती; पण बरेच प्रयत्न करूनहि तसा योग आला नाहीं. शेवटीं ' सुरस ग्रंथमाला पंढरपूर ' हिचे मालक मे. व्होरासाहेब याचेशीं गांठ पडली. त्यांनीं आपुलकीनं हस्तलिखित वाचून अल्पावधींत प्रसिद्धीचा योगहि आणला याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानूं ?

शेवटीं ही माझी अल्पसेवा साऱ्या वाचक बंधुभगिनींनीं गोड करून घ्यावी अशी सादर विनंति करून आभारपत्र पुरें करतो.

मुक्काम तळोदें, प. खा.<br>ता. १२-१२-१९५०

सर्वांचा कृपाभिलाषी<br>**आर. एल्. भांगरे.**

# त्याचें स्मरण

बरोबर एक तप झाले. तळोदें तालुक्यांतील 'मोरवड' या गांवीं मजुरीनं पोट भरणाऱ्या एका अशिक्षित भिल्लांत ईश्वरी अंश संचरला. त्यानं भिल्लांतच नव्हे, तर इकडच्या सर्वच समाजांत संपूर्ण दारूबंदीचा प्रयोग कांहीं काळ यशस्वी करून दाखविला. त्याच्या त्या महान् कार्याचा सरकारनं व जनतेनं मोठा गौरव केला. त्यानं एक दिव्य ज्योत पेटवून तिच्या प्रकाशांत दशदिशा उजळून सोडल्या. त्याचा मुख्य चमत्कार म्हणजे 'अशक्य वाटणारी ही मागासलेल्या समाजांतील दारूबंदी' त्यानं चुटकीसरशी यशस्वी केली. पण ...!

दुर्दैवानं आपल्या पवित्र हातानं दारूबंदीच्या या पवित्र कार्याची मुहूर्त-मेढ रोवणारा तो नरश्रेष्ठ लौकरच प्रभुचरणीं विलीन झाला, अगदीं अल्प-काळ विद्युल्लतेप्रमाणं चमकला व तडकाफडकीं अस्तंगत झाला. त्या

**आप गुला महाराजांचें स्मरण**

मी प्रथमतः करतों व मगच कथानकाला सुरवात करतों.

मु॥. तळोदें
तारीख १५-७-४९

लेखक

घोड्यांचे फिं-याळणें, तलवारी, भाले, बरच्या यांचा खणखणाट, आणि सैनिकांची धावपळ क्षणमात्र सुरू झाली नि झटपट बंदही झाली. फडणीस, रिसालेदार, कारभारी या सार्‍याच्या मानाचे मुजरे पेशव्यांनीं नुसत्या खुणेनंच स्वीकारले व ते कोणाशींही चक्कार शब्द न बोलता सरळ मस्तानच्या अंत:पुरांत चालून गेले. अंगावर जड पोषाक होता तोही त्यानीं उतरून ठेवला नाहीं.

त्यांच्या येण्याची चाहूल लागतांच मस्तानीला जाग आली. तिनं आपले डोळे उघडले व म्हटलं, " कोण ? श्रीमंताची स्वारी ? केव्हां येणं झालं ? मला कळलं सुद्धा नाहीं !"

तिनं उठून बसण्याचा जरासा प्रयत्न केला. तिची ती अवस्था पाहून पेशवे अधिकच बेचैन झाले.

" मस्तान, काय हे तुझे हाल ! तुझ्या प्रकृतीची कुणीच दक्कल घेतली नाहीं काय ? " तिच्या जवळ बसत त्यांनीं विचारलं.

" वा ! दक्कल घेतली नाही असं कसं होईल ? सार्‍यानी इथं येऊन चौकशी केली. शागीर्दांनीं राजवैद्यांना आणवलं व मला औषधोपचारही केला. आतां मला बरं वाटत आहे ! " तिनं म्हटलं.

पेशवे शांत झाले. तिच्या विस्कटलेल्या कबरीपाशावरून त्यांनीं प्रेमभरानं आपला हात फिरवला व तिला क्षणमात्र हृदयाशीं कवटाळून धरलं. मस्तानीला त्यामुळें बरीच हुशारी आली व ती उठून बसली. पेशव्यांनीं तिच्या उश्याला परांची, झालरदार उश्यांची, जोडी ठेवली व मेंदीनं लाल केलेला तिचा उजवा हात आपल्या हातांत धरून हळकेच विचारलं, " आतां बरं वाटतं ना ? "

" होय !" तिनं त्यांच्या स्नेहार्द्र नजरेला आपली नजर भिडवीत उत्तर दिलं.

" काय होत होतं तुला ? कुणी तुझी मानखंडणा तर केली नाहीं ? "

" नाहीं; तसं कांहीं नाहीं. उगाच गैरसमज करून घेऊं नये. आज जरा बरं वाटत नव्हतं इतकंच आणि......" इतकं म्हणून तिनं अंग शहारल्यासारखं केलं.

" आणि काय ? बोल मस्तान ! जे बोलायचं तें स्पष्ट बोल ! " पेशव्यांनीं अधीरतेनं विचारलं.

" दुपारचं तें दुष्ट स्वप्न...शी...शी...नको, त्याचा उच्चार न केले-लाच बरा ! " पुन्हा तिनं आंग शहारल्यासारखं केलं. पेशवे त्यामुळें अधि-कच काळजींत पडले. मग मस्तानीनं आपलं आंग तक्क्यावर रेलून दिलं व ती तशीच डोळे मिटून पडून राहिली. पेशव्यांनीं कितीतरी वेळ तिच्या पाठीवरून आपला हात प्रेमभरानं सारखा फिरविला व मग अंमळशानं ती उठून बसली.

" हो, पण बाळ समशेर नाहीं दिसत कुठं ? " पेशव्यांनीं आठवल्या-सारखं करून आतुरतेनं विचारलं.

बाळ समशेरचं नांव निघताच मस्तानीची कळी खुलली. तिचे नाजूक ओठ हलले. खुदकन हसून तिनं म्हटलं,

"झोपला तो पलीकडच्या पलंगावर ! फारच बंड झाला हो आतांशा ! ! सारखं म्हणतो कीं, ' सरकार मला का नाहीं नेत स्वारीवर...जा, मी उद्यां जाणारच ' आणि आज तर तुमच्या येण्याची आठवण काढून सारखा रडत होता बघा ! "

" खरंच... माझा बाळ तो. " असं म्हणतच पेशवे तेथून उठले व समशेर बहादूर झोपला होता त्या पलंगाजवळ आले. पाठोपाठ मस्तानीही आली.

नवारीच्या शिसवी पलंगावर तो सिंहाचा छावा गाढ झोपेच्या आधीन झाला होता.

पेशव्यांनीं प्रेमभरानं त्याच्या सर्वांगावरून हात फिरविला. त्याच्या कपाळा-वर आलेलीं जावळाचीं झुलुपं आपल्या हातानं दूर सारलीं व कपाळा-वरील घर्मबिंदू पुसून काढले.

आणि मग ते दोघे तिथंच जवळच्या बैठकीवर बसले.

" हं, सांग आता सर्व; कोणतें स्वप्न पडलें तुला ? " पेशव्यांनीं पुन्हा तिचा हात आपल्या हातांत घेत प्रेमभरानं विचारलं.

" नको. माझ्यानं त्याचा उच्चारही करवणार नाहीं एवढें तें भयंकर आहे. तें असो; पण आज एका गोष्टीचा सोक्षमोक्ष लावल्याशिवाय मी उद्यां-पासून अन्नाला शिवायचं नाही असं ठरविलं आहे. "

एवढं ती म्हणते आहे तोंच नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणं कोतवाल मद्याची सुरई व चषक हीं ठेवलेलं सोन्याचं ताट घेऊन तिथं हजर झाला. त्यानं ते ताट समोरच्या कपाटावर हलकेंच ठेऊन दिलं व श्रीमंतांकडे पाहून अदबीनं कुर्निसात करून तो परत फिरला. पेशवे भानावर आले. त्यांनीं एवढा वेळ आपल्या अंगावर तसाच राहूं दिलेला जड पोषाक भराभर उतरून ठेवला आणि पराच्या त्या मऊ गादीवर ' हुश्श ' करीत आपलं आंग पसरून दिलं. आता नेहमींप्रमाणे मस्तानीच्या नाजूक हातानीं भरलेला उंची मद्याचा चषक आपल्या ओठाजवळ अलगत येऊन भिडेल, या गोड [illegible] ते मनात बहोत खूष होत होते; इतक्यांत...

" कोतवाल ! " असं मोठ्यानं मस्तानीनं म्हटलं व त्यासरशीं बाहेर हुकुमाची वाट पहात असलेला कोतवाल ' जी साहेब ' असं म्हणत त्यांच्या-समोर येऊन उभा राहिला.

" आज तें ताट परत ने ! " तिनं कोतवालाला हुकमी आवाजांत म्हटलं. कोतवालाचा आपल्या कानावर विश्वासच बसेना. तो तिथंच खालीं मान घालून उभा राहिला. आज पेशवे थकून आलेले; दुसरी बाटली आण, मग काहीं वेळानं तिसरी, अशी आज्ञा होण्याऐवजीं मस्तानी स्वतः मद्याचं ताटच परत न्यायला सांगते म्हणजे काय ?

" ऐकलम ना मी काय सांगितलं तें ? उभा कां ? ने ते ताट परत ! " पुन्हा ती हुकमी आवाजांत म्हणाली.

मद्याचं ताट परत नेलं गेलं. पेशव्यांना या प्रकाराचा काहींच अर्थ कळेना. ते मस्तानीकडे नुसते नजर रोखून पहात राहिले. क्षणमात्र सारीच स्तब्धता...शांतता. कुणीच कुणाशीं बोललं नाहीं. अशा स्थितींत जरा वेळ गेल्यावर मस्तानीनं पेशव्यांचा हात आपल्या हातांत धरून म्हटलं, " मी आज मुद्दामच मद्याची सुरई परत केली आणि आज मला

त्याबद्दलचंच वचन हवं आहे." तिच्या त्या चमत्कारिक खुलाशानं पेशवे आश्चर्यचकित झाले. मस्तानी आज प्रथमपासूनच अशी चमत्कारिक कां वागते याचं गूढ त्यांना कळत नव्हतं. त्यांनीं तशा संभ्रमावस्थेंत विचारलं, " वचन ? आणि तें कशाबद्दल ? मस्तान, आज हें चालवलं आहे तरी काय तूं ? आज तुला झालंय् तरी काय ? " त्यांनीं अगदीं काकुळतीला येऊन म्हटलं.

" आज माझ्या मनानंच तसं घेतलंय् ! वाड्यांतील सारे प्रधान, कारभारी, फडणीस, शास्त्रीबुवा, महाराण्या सारे सारे म्हणत आहेत, मीच आपल्याला मद्याचा नाद लावला, अधोगतीला कारण झालें व होत आहें ! "

" हत्तेच्या ! एवढ्यानं का धाबरून गेलीस ? अशा किरकोळ गोष्टींना आम्ही महत्त्व देत नसतों ! ! "

" तें त्यांचं म्हणणं आहे म्हणूनच नव्हे, तर तें दुपारचं दुष्ट स्वप्न... ! शी शी ! आज मद्याचा कायमचा त्याग केल्याची शपथ घेतल्याशिवाय माझ्या मनाला शांतता लाभायची नाहीं. "

पेशव्यांचा नाइलाज झाला. मस्तानीनं आपलं डोकं त्यांच्या मांडीवर टेकून दिलं. पेशवे जराशा विचारांतच पडले. " कसला एवढा विचार चालवला आहे तो ? " तिनं त्यांच्या खांद्यावर हात फिरवीत विचारलं.

" मस्तान, दुसरं काहीं सांग ! समुद्र ओलांडून जायचं सांग, रातोरात दिल्ली गाठायचं सांग, किंवा एखादा अवघड किल्ला जिंकून आणायाची मनीषा व्यक्त कर, पण मद्यायला सोडायचं...छे ! "

" हो ! मद्याला सोडायचं आणि तेंही या क्षणापासून ! ! पेशव्यांच्या या वैभवशाली वाड्यांत, ब्रह्मवृंदांच्या नेहमींच्या मंत्रजयघोषांत, व्रतवैकल्यांनीं पुण्य जोडणाऱ्या पवित्र सतींच्या या महालांत, जिथं माझ्यासारखी यवन स्त्री देखील समावली गेली, त्या पवित्र शिवरायांच्या या पुण्यभूमींत मुख्य पेशव्यांनीं मद्याच्या मोहांत अडकून रहावं हें मला नाहीं पसंत ! "

" मग काय करावं म्हणतेस ? "

पेशव्यांनीं तक्क्याला पाठ टेकून दिली आणि ते शून्य दृष्टीनं खालीं

गालिच्याकडं पहात तसेच बसून राहिले. सारं वातावरण शांत होतं तिथलं. नेहमींच्या पंखे उडविणाऱ्या दासीलाही आज तिथं येण्याला प्रतिबंध केला गेला होता. अशा स्थितींत काहीं क्षण गेल्यावर मस्तानी सांगूं लागली--

" शास्त्रीजींनीं सांगितलं, इकडचा स्वभाव भारी हेकेखोर ! कोणाची स्पष्ट सागण्याची प्राज्ञा नाहीं. सान्यांनीं विचार केला नि म्हणाले, मन्नि या गोष्टीला पायबंद घालावा. राणीसाहेबदेखील असंच म्हणाल्या. फार कळकळल्या, रडल्या. खरंच, सोडा ही अवदसा. घ्या शपथ माझ्या गळ्याची !"

" पण मस्तान, मला शक्य नाहीं व्हायचं ते. सारा दिवसभर केलेल्या घोडदौडीच्या श्रमानंतर मद्याचा थोडासा गुलाबी आस्वाद मिळालाच पाहिजे मला. प्यारी ! तुझ्या या नाजूक हातांनी तो अमृताचा चषक या आतुर ओठांना लागावा नि मग..."

" पुरे ! नका त्या राक्षसीचं एवढं महत्त्व सांगूं मला ! घोडदौडीचा सारा शीणभाग घालवायला मी स्वतः स्वारीवर असाल त्या वेळीं बरोबर रहाण्याचं ठरविलं आहे. मी बरोबर असल्यावर मग मदिरेची जरूर का वाटावी ? ते काहीं नाहीं. आतां या क्षणाला मदिरेला हात लावणार नाहीं अशी शपथ त्या पवित्र शिवरायाच्या तसबिरीला साक्ष ठेऊन घेतलीच पाहिजे."

पवित्र शिवरायाचं नाव निघताच पेशव्याचं अन्तःकरण पुरेपूर भारून निघालं मस्तानीच्या चर्येवर देखील एक अभिमानाचं तेज चमकून दिसूं लागलं. हंड्या-झुंबऱ्याच्या दिव्य प्रकाशानं ती खोलीही तेजाळून गेली. क्षणमात्र पेशव्यांनीं मस्तानीच्या नजरेला आपली करारी नजर भिडविली व लगेच म्हटलं, " कबूल ! मस्तान, तूं म्हणतेस तें मला अक्षरशः कबूल ! ! या मदिरेनं आतापावेतों कोणाचं बरं केलें आहे तर ते माझं होणार ? पौराणिक काळच्या मोठमोठ्या योद्ध्यांना हिनं धुळीला मिळविलं आहे, मोठमोठ्या बलाढ्य राज्यसत्ताची हिच्यामुळं तीन चिमट्या राख झाली आहे. पवित्र शिवरायानं रक्ताचं पाणी करून स्थापन केलेलं हें हिंदवी स्वराज्य ! त्याची धुरा वहाणाऱ्या मजसारख्या ब्राह्मण योद्ध्यानं मदिरेला चिकटून रहावं. खरंच, फार फार चूक झाली माझी. मस्तान, आजः

तूं मला या मुख्य गोष्टीची जाणीव करून दिलीस......खरोखर तूं माझी 'स्फूर्तिदेवता' आहेस. आता मी त्या विघ्नहर्त्या गणरायाला व पवित्र शिवरायांना साक्षी ठेऊन अशी प्रतिज्ञा करतो कीं, 'मी या क्षणापासून मद्याला आमरण शिवणार नाहीं.' बस ! ठरला माझा निश्चय !"

"खरंच ! खरं ना हें ? का क्षणिक...?"

"अगदी खरं ! गर्दन गेली तरी या निश्चयांत बदल व्हायचा नाहीं !"

मस्तानीच्या गौर मुखकमलावर एका दिव्य प्रकाशाची प्रभा विलक्षण तेजानं चमकून दिसूं लागली. पेशव्यांच्या भव्य छातीवर तिनं आपलं डोकं टेकून दिलं व ती तशीच झोपेच्या आधीन झाली.

आणि मग पहांटेचा चौघडा व सनई यांच्या मंजुळ आवाजानं ते दोघे भानावर आले.

...आज गणेशचतुर्थी होती. पेशव्यांनी स्वतः शास्त्रोक्त गणरायाची प्राणप्रतिष्ठा केली आणि आपल्या रात्रीच्या प्रतिज्ञेचा त्या मंगलदेवतेसमोर पुनरुच्चार केला.

आणि त्या प्रसंगानंतर खरोखरीच बाजीरावानं पुन्हा केव्हांही मद्याला हात लावला नाहीं.



# मदिरा-मस्तानी

## मदिरा .......दारू .......सुरा........छे !

मग काय, मनुष्याच्या आयुष्याचा सत्यानाश करणारें विष ? छे ! छे !

**विषसुद्धां नव्हेच.**

विषानं मनुष्य तडकाफडकीं मरतो तरी. पण दारूमुळें जिवंतपणींच मरणाच्या तीव्रतर यातना सारख्या भोगाव्या लागतात. विषापेक्षांहि महाभयंकर...

*　　　*　　　*

## प्रकरण १ लें.

खरोखर या दुनियेंत कांहीं कांहीं भाग्यशाली माणसं तोंडात सोन्याचा चमचा घेऊनच जन्माला येतात. त्यांना पोटाची खळगी भरण्याकरितां कांहींही विवंचना करावी लागत नाहीं. बापजाद्यांनीं हजारों-लाखों रुपयांची इस्टेट मागें ठेवलेली असते. सुंदर सुंदर घरें, उंची कपडा, मुग्रास अन्न, सुंदर बायका, सारं सारं कसं अगदीं तयार असतं त्यांच्यासाठीं ! मग विलासी वृत्तींतच शिक्षण होतं, पदव्या मिळतात, लग्नं होतात व बाळसे-दार मुलंही होतात. हें सारं अगदीं सहजगत्या होतं त्यांचं ! त्याकरता त्यांना जिवाचा जराही आटापिटा करावा लागत नाहीं. सर्वसामान्य लोकांना तिखटमीठ मिळविण्यासाठीं कसें रक्ताचें पाणी करावे लागतें ही गोष्ट त्यांच्या गांवींही नसते. गुढघ्याइतक्या मऊ मऊ गादीवरच ते सुखा

सदासर्वकाळ लोळण घेत असतात. अशा भाग्यशाली वर्गातल्या लोकांतच प्रोफेसर दौलतराव यांची गणना करायला हरकत नाहीं.

पंचवीस वर्षांपूर्वी दौलतरावाचे वडील पर्वतराव यानीं कोल्हापूर सोडून मुंबईला आपलं बिऱ्हाड कायमचं ठोकलं व नंतर लौकरच तिथं सराफीच्या धंद्यात त्यांनीं खोऱ्यानं पैसा ओढला. दौलतरावाना खूपखूप शिकवावं, आय्. सी. एम्. परीक्षा पास करून कलेक्टरच्या बड्या हुद्यावर विराजमान झालेलं स्वतःच्या डोळ्यानीं पहावं अशी त्यांची मनीषा होती व दौलतरावही जात्याच हुषार असलेनें त्यांनीं सोळाव्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा देऊन एकवीस वर्षे पूर्ण होण्याच्या अगोदरच बी. ए. ची डिग्रीही संपादन करून टाकली. आय्. सी. एस्. होण्याचे नच जमले तर, पर्वतरावांची दुसरी इच्छा त्याना चागल्यापैकीं डॉक्टर करणेची होती. पण दौलतरावाच्या आवडीप्रमाणे ते दोन्ही विचार रद्द होऊन पुढें एम्. ए. व त्यानंतर लगेच प्रोफेसर होण्याचा योग जुळून आला व आतां त्यांना प्रोफेसर होऊन चार वर्षांचा काळही उलटून गेला होता.

दौलतराव प्रोफेसर झाले व त्याच सुमारास पर्वतरावानी इहलोकचा निरोप घेतला. पर्वतराव वारल्यावर सर्व इस्टेट दौलतरावाच्या हातात आली. एवढी मोठी इस्टेट त्याना नुसते बसल्या बसल्या खाऊनही पुरली असती. नोकरी करण्याची त्याना तशी गरजही नव्हती. पण त्यांना विद्येचा व्यासंग जबर व प्रोफेसरी ही त्यांची आवडती नोकरी. या कारणांमुळे त्यानीं प्रोफेसरीला रामराम ठोकला नाहीं. त्याना पत्नीही तशीच अनुरूप लाभली होती. सुनंदा तिचें नाव ! घरांतील सारें कामकाज सुनंदा मोठ्या आवडीनं करी. हाताखालीं गडीमाणसं होतीं; पण महत्वाचीं अशीं सारीं कामं ती आपण स्वतःच करी. छोट्या अशोकचे कोडकौतुक उभयतां पतिपत्नी खूप खूप करीत असत.

प्रसिद्ध खानदानी कुणबी पाटील घराण्यांत दौलतरावाचा जन्म झालेला होता. अंगापिंडानें ते मराठशाही इतमामाला शोभेल असेच मजबूत बांध्याचे व भरदार शरीरयष्टीचे होते. त्यांच्या पिळदार-मिशा मराठशाही

रुबाबाला फार फार खुलून दिसत असत. त्यांचा नेहमींचा पोषाख म्हणजे कोल्हापुरी पद्धतीची निमुळती होत गेलेली सुरवार, मोकळ्या बाह्यांचा शर्ट व त्यावर बंद गळ्याचा गुडघ्याइतपत येणारा कोच आणि डोक्यावर अक्खडबाजपणे बांधलेला गुलाबी रंगाचा फेटा! या रुबाबात ते फारच खुलून दिसत असत. कॉलेजात जाताना ते सदासर्वकाळ हाच पोषाख चढवून जात असत. पाश्चात्य पद्धतीच्या पोषाखाचा ते जरा तिरस्कारच करीत. कॉलेजच्या परिसरांत पाय टाकताच ते सरळ आपल्या कॉमन रूममध्ये जात व तेथे अंगावरचा कोच काढून खुंटीला लावून ठेवीत. मग तोंडानें हुश्यऽऽऽ करीत ते जरा वेळ टेबलावर येऊन पडलेला टपाल चाळून पहात. हें काम चालू असताना आपल्या झुबकेदार मिश्यांना हाताच्या बोटांनीं पीळ भरण्याचा चाळाही ते मधून मधून करीत असत. एखादी गोष्ट मनासारखी घडून आली म्हणजे किंवा एखाद्या आवेशपूर्ण भाषणाच्या वेळी ते आपल्या दोन्ही बोटांची जुळणी ओठाच्या मध्यभागावरून सुरू करून मिश्यांचा पीळ दाबीत दाबीत विरुद्ध दिशेला बोटांची फेक करीत. इतिहास हा त्यांचा फारच आवडीचा विषय! तो शिकवीत असताना ते त्यात फारच तन्मय होऊन जात. मग अशा वेळी त्यांच्या हाताचीं बोटं नेहमी त्या विपुल काळ्या कुळकुळीत मिश्यांना सतत पीळ भरीत रहात. त्यांचा तो एक चाळाच होता असें म्हटलें तरी चालेल. इतिहास हा तर त्यांचा आवडीचा विषय होताच; पण त्यातल्या त्यांत संभाजीमहाराजांचा भाग हा त्यांचा फारफार आवडीचा होता.

संभाजी महाराजाचे चरित्र सांगायला त्यांनीं सुरवात केली म्हणजे सारे कॉलेजविद्यार्थी मंत्रमुग्ध होऊन जात. औरंगजेब बादशहाने संभाजी महाराजाना, जेव्हां प्रश्न केला कीं, " तूं मुसलमान होतोस काय ? " त्यावर महाराजांनीं त्याला जे बाणेदार उत्तर दिलें, तो प्रसंग वर्णन करून सागत असतां साऱ्या विद्यार्थ्यांचीं मनें देशप्रेमाने, धर्मप्रेमानें, वीरश्रीनें भारून निघत. शहरांत कोठें संभाजी महाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव असला म्हणजे त्या प्रसंगीं त्यांच्या चारित्रवर्णनाचा मान प्रामुख्यानें दौलतरावांनाच मिळे.

त्यांची मुंबई व कोल्हापूर येथें जी स्थावर इस्टेट होती, तीवर देखरेख करण्याकरतां त्यांच्या वडिलांनीं विश्वासानं लावलेला मुनीम नीळकंठराव शिकारे हाच पूर्वीपासून देखरेख करीत होता. वर्षअखेरीस एकदां स्वतः प्रोफेसरसाहेब हिशेब बरोबर असल्याची आपली खात्री करून घेत व मग साऱ्या वर्षात त्यांना आपला उद्योग बरा कीं आपण बरें, असें सहाजिकच सरळ आणि सोपें जीवन कंठावें लागे. त्यांचा मित्रपरिवारही फार मोठा नव्हता.

कारण ते समाजांत फारसे मिसळत नसत. वाचनाचा त्यांना जबरदस्त नाद होता. कॉलेजमधून घरीं आले म्हणजे छोट्या अशोकचे थोडा वेळ कौतुक करून व सुनंदेच्या हातचा झकासपैकीं चहा पिऊन ते आपल्या रीडिंग रूममध्यें जाऊन बसत. मग आलेल्या वर्तमानपत्रांचा व मासिकांचा खरपूस समाचार घेऊन नंतर नानाविध विषयावरील ग्रंथांचे वाचन व मनन करीत. या कामांत किती वेळ निघून गेला याचें त्यांना भानच रहात नसे. मग सुनंदेनं हळूच दाराच्या फटींतून डोकावून पहावं व स्वयंपाक निऊन चालल्याची वर्दी द्यावी आणि मग 'अरेऽऽऽच्या ! चु...चुऽ ' करीत भिंतीवरील मोठ्या घड्याळाकडे ओझरता दृष्टीक्षेप करून त्यांनीं भानावर आल्यासारखें करावें व नंतर सुग्रास अन्नाच्या वासानं दरवळून राहिलेल्या प्रसन्नशा भोजनगृहांत येऊन दाखल व्हावं. अशा रीतिचा त्यांचा सुखाचा दिनक्रम चालला होता.

कधीं कधीं त्याचे बालमित्र किंवा बरोबरचे सहाध्यायी त्यांच्याकडं बसायला येत; त्या वेळीं प्रोफेसरांच्या दिवाणखान्यात वादविवादाला महापूर येई. त्यांचे मित्र प्रोफेसर रत्नपारखे यांना शास्त्रीय शोधाचा फार छंद होता; ॲडव्होकेट चंद्रराव यांना ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करण्याचा नाद होता; डॉक्टर रमानाथ यांना भूतयोनीबद्दलचा शोध लावण्याचा छंद होता; आणि शेठ रमणलाल यांना गुप्तधनाचा विषय फार फार आवडत होता. याशिवाय प्रोफेसर रंगराव हेही त्यांचे लंगोटीमित्र होते. अशा रीतीच्या निरानिराळ्या विषयांत आपली बुद्धी सदासर्वकाळ अडकवून ठेवणाऱ्या विचारवंतांचा मेळावा केव्हां केव्हां प्रोफेसर दौलतरावांच्या भव्य

व सुशोभित अशा दिवाणखान्यांत भरलेला दिसे व अशा रीतीनें सारे विद्वान लोक तिथं एकत्र झाले म्हणजे एखाद्या राजकीय विषयावर त्यांची जी चर्चा चाले, ती खरोखर ऐकण्यासारखी असे.

अशाच प्रकारें आज रविवारचा सुटीचा दिवस म्हणून त्यांच्या 'दौलत-निवास' या छोट्याशा टुमदार बंगलीत त्यांचे सारे मित्र एकत्र जमले होते. बऱ्याच दिवसांनीं सारे बालमित्र एकत्र जमा झालेन अल्पोपहाराचा बेत प्रो. दौलतरावांनीं मुक्रर केला होता आणि आज चर्चेला विषय देखील मोठा मनोरंजक व बोधप्रद निघाला होता. 'प्रांतिक सरकारचें दारूबंदीचें धोरण' हा तो विषय होता.

'दारूबंदी होणें इष्ट का अनिष्ट ?' या प्रश्नावर ते सारे मोकळ्या मनानें चर्चा करीत होते. राऊंड टेबलाभोंवती जमलेल्या साऱ्या पदवी-धरांनीं त्या चर्चेत अहमहमिकेनें भाग घेतला होता.

"खरंच, मी म्हणतो मुंबई सरकारचें दारूबंदीचें धोरण स्वागतार्ह आहे. आस्ते आस्ते दारूगुते कमी करीत करीत सन १९५० सालांत दारूचें संपूर्ण उच्चाटन करून या मदिराराक्षसीचें भूत कायमचें गाडण्याचा निर्धार सरकारनें जाहीर केला, ही गोष्ट मला तरी फार फार अभिनंदनीय अशी वाटते." ॲडव्होकेट चंद्रराव सिगारेटचा पल्लेदार झुरका खेचत म्हणाले.

"फार चूक होते आहे तुमची साऱ्यांची ! सरकारचें दारूबंदीचें धोरण एकदम पसंत आहे, एवढा नुसता शेरा मारून मोकळे होण्याइतका साधारण प्रतीचा हा विषय नाहीं. मी म्हणतों, 'लोक दारू का पितात ?' या गोष्टीची मानसशास्त्रदृष्ट्या छाननी व्हावयास पाहिजे. माझ्या मते दारूबंदी एकदम जारी करूं नये. दारूबंदी खरोखर यशस्वी करण्याकरितां माणसाची मनोरचनाच बदलली गेली पाहिजे. दारू पिणे हा नैतिक अधःपात आहे, दारू हें विष आहे, साऱ्या संसाराची धूळदाण करणारी ती राक्षसी आहे; हें तत्त्व प्रत्येकाच्या मनावर चांगल्या रीतीनें बिंबवलें गेलें पाहिजे. दारू ही चीज अनादिकालापासून पृथ्वीतलावर धुडगूस घालीत आहे. हिच्या कचाट्यातून देवलोकही सहीसलामत सुटलेले नाहीत. देव आणि दैत्य, साऱ्यांना हिनें मोहिनी घातली आहे. पुराणांत सुद्धां हिचा उल्लेख आलेला आहे.

अशा रीतीनं ताव्रून सुलाखून निघालेलं हें रत्न, ही मोहमाया, ही जादूगारीण, हे हलाहल जन्माला आलेलं आहे. त्याचा निःपात होणं कसे शक्य आहे ? मला तरी हे तुमचे म्हणणं मुळीच पटत नाहीं." प्रो. रत्नपारखे आवळलेली मूठ टेबलावर आपटीत म्हणाले.

"बरोबर ! अगदी बरोबर बोललात मि. रत्नपारखे ! अहो, आजकाल जो उठतो तो सरकारी धोरणाची तळी उचलून धरतो. सरकारनें म्हटलें, दारू बंद करा, की लगेच हे म्हणतात, 'अलबत ! आत्ताच्या-आत्ता बंद करा ! दारूचा एकही थेंब आता दृष्टीला पडता उपयोगी नाहीं.' आणि लागलेच सारे गर्जना करायला—'दारू पीना हराम है !' म्हणून मी म्हणतो, अशाने का दारूबंदी होणार आहे ? अहो महाराज, दारू बंद होण्याची तर गोष्टच बोलूं नका; पण पिणाऱ्याची संख्या मात्र रोजच्या रोज वाढतेय् म्हटलं. अहो, दारू ही आमच्यासारख्या मानसिक श्रम करणाऱ्यांना श्रमपरिहारार्थ अवश्य पाहिजेच असते. 'माणूस बेहोष का होतो' याचा जरा बारकाईनं विचार केला म्हणजे येईल तुमच्या साऱ्याच्या लक्षांत मी काय म्हणतो ते !" प्रो. रंगराव सिगारेटवर आलेला गुल ॲशट्रेमध्ये झटकीत म्हणाले.

इतक्यात उपहाराची तयारी झाल्याची वर्दी आलेने सारेजण तेथून उठले व आंतील दिवाणखान्यात येऊन खुर्च्यांवर आसनस्थ झाले आणि मग तो विषय तेवढ्यावरच राहिला.

नंतर दोनच दिवसांनीं प्रो. रंगराव यांच्याकडे ग्वाल्हेरचे एक बडे पाहुणे आले होते. त्यांच्याकरता एके सायंकाळीं जेवणाचा मराठशाही बेत प्रोफेसर मजकूर यानी मुद्दाम मुक्रर केला होता; आणि त्याचें आमंत्रण दौलतरावांनाही त्यांनीं आग्रहानं दिले होते. प्रो. रंगराव हे प्रो. दौलतरावांचे लंगोटीमित्र होते हे वर आले आहेच. दोन्हीही हुषार, तसेंच गाढे विद्वान होते. पण रंगराव हे जरा ऑलराउंड स्वभावाचे, तर दौलतराव जरासे माणसघाणे होते. रंगराव याना कोठेंही कांहींही विषय वर्ज्य नव्हता; पण त्याउलट दौलतराव प्रत्येक गोष्ट विचारपूर्वक अंगिकारीत. राजकारणात देखील रंगराव हे जसा वारा वाहील तशी पाठ फिरविणारे होते, तर दौलत-

राव त्या विषयापासून सर्वस्वीं अलिप्त असे होते. अशा भिन्न विचारसरणीचे ते दोन्ही प्रोफेसर मित्र होते. असे जरी भिन्न भिन्न मतप्रवाह त्यांचे होते, तरी त्यामुळें त्यांच्या अकृत्रिम मित्रप्रेमाला कधी ती गोष्ट आडवी आली नाहीं. नेहमीं ते परस्पराची आस्थेनं विचारपूस करीत. सुनंदाबाईसुद्धां मधून मधून रमाबाईकडं–प्रो. रंगराव याच्या पत्नीकडं–बसायला जात व आपला घरोबा जेणेकरून कायम राहील असे वागत.

आजच्या प्रसंगी [illegible] खास मराठशाही बेत प्रो. रंगराव यांनीं योजला होता व जेवणाला आमंत्रण फक्त दौलतरावानाच दिलं होते; एवढेंच नव्हे तर सायंकाळच्या सुमारास त्यांनीं आपली बेबी ऑस्टीनही मुद्दाम त्यांना घेण्याकरतां पाठवून दिली आणि दौलतरावही बहोत खूष होत्साते आपला कडक इस्त्रीचा अप–टु–डेट पोषाख परिधान करून रंगरावांच्या निवासस्थानीं रवाना झाले. ग्वाल्हेरहून आलेले बडे पाहुणे मेजर सर्जेराव हे खाली लताकुंजातच फुलझाडाची शोभा पहात उभे होते. त्यांनीं दौलतरावाना पाहून स्मित अभिवादन केलं व त्यांनीं पुढे केलेल्या हाताचा शेकहँड घेतला. रंगराव वरच्या मजल्यावरच होते. शेकहँड करून उभयतांनीं सस्मित स्वागताचा विधि पार पाडल्यावर ते बोलतबोलत खास सजविलेल्या अशा दिवाणखान्यांत येऊन दाखल झाले.

रंगराव आतमध्ये कायसेसे करीत होते.

आसनस्थ होताच पाहुण्यानीं–मेजर सर्जेरावानीं–दौलतरावाच्या हातीं चिरूट दिला; व थँक्स म्हणून त्यांनी त्याचा स्वीकार केला. या वेळीं सायंकाळ होऊन गेली होती. निरनिराळे विद्युत्‌गोल त्या सुशोभित दिवाणखान्याला प्रकाशमय करीत होते. अंमळशानं टॉवेलला हात पुशीत रंगरावही तिथं येऊन दाखल झाले व त्यानीं दौलतरावाकडे पाहून स्मित केलं. दौलतराव सावकाश चिरूट पीट होते. बाजूच्या भिंतीवर घड्याळाचा कट् कट् आवाज होत होता. रंगरावानीं दोन शब्दात पाहुण्याशी त्यांची ओळख करून दिली व पुन्हा उभयतांनीं येस् येस् म्हणून हातमिळवणी केली. औपचारिक ओळखीचा विधि पार पडल्यावर एक दोन क्षण तिथं स्तब्धता होती. मग रंगरावांनीं बोलायला सुरवात केली.

" हं, कस काय दौलतराव, ठीक तर आहे ना ? "

" बहोत ठीक ! " त्यांनीं म्हटलं.

आणि नंतर लागलीच रंगरावांनीं शेजारच्या उंची पॉलिश केलेल्या शिसवी कपाटातून लाल रंगाच्या लेबलची नक्षीदार अशी मद्याची बाटली काढून ती मेजर सर्जेराव याच्या हातीं दिली, व त्या पाठोपाठ सुंदर काचपात्रांचा ट्रेही त्यांनीं मेजावर आणून ठेवला. कांचपात्रांचा तो क्रमवार लावून ठेवलेला सुंदर सेट पहातांच प्रो. दौलतराव आता पुढे काय होणार तें मनाशीं तात्काळ समजलें. या वेळपावेतो ते मद्याच्या एका थेंबालाही शिवलेले नव्हते.

मेजर सर्जेरावानीं त्या सुंदर बाटलीचें रबरी बूच काढून अलग केलें व ती तशीच उघडी टेबलावर ठेऊन दिली. मग लागलीच पाठोपाठ रंगरावानीं सोड्याची बाटलीही बूच ओढून मोकळी केली. उंची मद्याचा अतिसूक्ष्म व लज्जतदार ( ? ) असा वास तिथं त्या रम्य सजावटींत, त्या एकातशा मधुर वातावरणात दरवळून उठला. दोन ड्राम मद्य मावेल अशीं तीन सुबक काचपात्रे प्रत्येकापुढें एक अशी ठेवली गेलीं व त्यांत लाल लाल मद्याचा थोडा थोडा भाग टाकला गेला; त्यानतर पाठोपाठ सोडाही समसमान विभागला गेला.

" हं घ्या ! करा सुरवांत मि. दौलतराव ! " रंगराव प्याला त्यांच्या पुढं करीत म्हणाले.

मेजर सर्जेरावानीं सराईत हातानं तो प्याला चटदिशी उचलून घेतला. पण प्रो. दौलतराव हात पुढें करीतना. ते अंमळ विचारांत पडले. ते मनाशीं विचार करूं लागले, ' प्याला हातांत घ्यावा कीं घेऊं नये ' त्याचें एक मन म्हणे, घ्यायला कांहीं हरकत नाहीं. परमेश्वरानं या पृथ्वीतलावर जेवढ्या म्हणून चिजा निर्माण केल्या आहेत त्या सर्व मानव प्राण्याच्या अंतिम सुखासाठीं व संवर्धनासाठींच आहेत. जन्माला येऊन त्या सर्व चिजाचा आस्वाद एकदां तरी मानव प्राण्यानं घेऊन पाहिलाच पाहिजे. लगेच त्यांचें दुसरें मन म्हणे, नाहीं ! दारूच्या या प्याल्यानं जगांत आजवर कोणाचें भले केलें आहे तर तें तुझें होणार ? आज मित्राच्या

गोड आग्रहाला बळी पडून आपण तिचा एक घोट घेतला तरी पुढें कायमचेच तिचे दास बनणार नाहीं हें कशावरून ?..."हं, घ्या प्रोफेसरसाहेब, करा कीं सुरवात ! अहो, ती काहीं गुंगी आणणारी, नाहीं. पाचक, पौष्टिक व अगदीं गुलाबी अशी रंगदार झुळूक आणणारी संस्थानांत बनलेली परीछाप आहे ती ! अंमल येण्याची भीति नाहींच त्यामुळं ! " मेजर सर्जेराव आग्रहानं म्हणाले व त्यांनीं आपला प्याला ओठांशीं अलगत नेऊन भिडाविला. त्यांचेंच अनुकरण रंगरावांनीं केलं व शेवटीं नाइलाजाने दौलतरावांनाही चाखत माखत त्या लालबाईचा आस्वाद घ्यावा लागला.

" मी म्हणतों दारू पिऊन मनुष्य आयुष्यातून उठतो हें म्हणणेंच मला पटत नाहीं. साऱ्यांनीं दारूच्या नांवानं केलेली कोल्हेकुई आहे ती ! एकदां घेतली म्हणजे ती सुटतच नाहीं, हें म्हणणें सुद्धां तिच्या आहारीं जाणून बुजून गेलेल्यांचें मनोदौर्बल्यच दाखवितें. मी स्वतः मधून मधून नेहमीं दारू घेत असतों; पण मध्यंतरी सहा सहा महिने जरी ती मला मिळाली नाहीं तरी तिची आठवण सुद्धां मला येत नाहीं. " रंगराव शेवगाठीचा फक्का तोंडांत टाकीत म्हणाले.

" हेंच खरें ! माझे सुद्धां असेच आहे ! म्हणे दारू एकदां घेतली म्हणजे ती सुटतच नाहीं ! मी छातीला हात लावून सांगतों कीं, हें म्हणणें निव्वळ थोतांड आहे. न्यूनगंड आहे तो ! " मेजर सर्जेराव चिरूटाचीं धूम्रवलयं फुंकारीत म्हणाले.

" आपण कोणत्याही दृष्टीने विचार केला तरी माणसाला खरोखरी दारूची कांहींही जरूरी नाहीं. दारू पिताना मनुष्य तोंड वेडेवांकडें कां करतो, या साध्या नियमांतही हेंच सिद्ध होतें कीं, मनुष्याला निसर्गतःच अमली पेयाची जरूर नाहीं. मानसशास्त्राचा तो एक सिद्धांत आहे. " प्रो. दौलतराव दोघांकडं पहात निश्चयानं म्हणाले.

" अहो, एवढा तत्त्वज्ञानाचा आधार घेण्याची कांहींच जरूर नाहीं. एकदां घेतल्यानें मनुष्य कायमचाच तिच्या आहारीं जातो या म्हणण्याचा फोलपणा सिद्ध करण्याकरतां मी म्हणालों होतों. " मेजरसाहेब म्हणाले.

" माझेंसुद्धां असेंच मत आहे. केव्हां एखादे प्रसंगीं एखादा पेग मारला

तेवढ्यानें कांहीं नुकसान होत नाहीं. एखाद्या गोड पक्वान्नाचें जेवण आपण सणावारीं करतों म्हणजे दररोजच त्या जेवणाची रुख धरून बसतों असें थोडेंच आहे ? दारूच्या बाबतींतसुद्धां तसेंच समजतों मी. कांहीं विवक्षित प्रसंगीं ती घेतली किंवा घ्यावी लागली म्हणा, तर तेवढ्यानें आपण पुन्हा कायमचें तिच्या जाळयांत अडकून जाऊं हें म्हणणें मला तरी पटत नाहीं. " मेजरसाहेब पुन्हा बाटली हातांत घेत म्हणाले.

" ते कसेंही असलें तरी तुमचे म्हणणे नाहींच पटत मला. " दौलतराव म्हणाले. " वा, भले शाबास ! पुन्हा आपले तेंच ! अहो, मनुष्यानं जन्माला येऊन सर्व चीजांचा आस्वाद एकदां तरी घेऊन सोडलाच पाहिजे. नुसत्या कल्पनेनं दारूच्या नांवानं बोटें मोडत रहाणं मला तरी पसंत नाही. शिवाय प्रोफेसरसाहेब, हें लक्षांत ठेवा कीं, आपण सुसंस्कृत माणसं. केवळ मौजेखातर किंवा अनुभवाखातर एखादी गोष्ट केली म्हणजे, कायमचा तिचाच अंगिकार करीत राहूं हें म्हणणें आपल्यासारख्या प्रगल्भ विचारांच्या बड्या माणसांना तरी शोभत नाहीं. अगदीं पहिल्या प्रथम दारूच्या प्याल्याला हात लावण्यापूर्वीं मीसुद्धां चाचरत होतों. एकच प्याला नाटक पाहून व सामान्य लोकांच्या तोडच्या दारुड्यांच्या करुणाजनक हाकिगती ऐकून मलाही वाटे, नकोच ती विषाची प्रचीती पहाणं ! पण माझ्या दुसऱ्या संशोधक मनानं म्हटलं, पहा तर खरा एकदां अनुभव घेऊन ! एकदां घेतली म्हणजे सुटतच नाहीं, या समजुतीचा फोलपणा स्वतःच्या अनुभवाला तरी येईल. या अशा विचारानं मी त्या वेळीं मदिरेचा पहिला ग्लास तात्काळ पिऊन फस्त केला; पण खरंच सांगतों, त्या प्रसंगानंतर मला पुन्हा कधीं तिची आठवणही झाली नाहीं. एकदां घेतली म्हणजे माणूस तिच्या आहारीं संपूर्णपणें जातो हें म्हणणें दुबळ्या मनाचें लक्षण आहे. खरंच मित्रा, मी म्हणतों याची प्रचिती तुला आजच्या प्रसंगानं येईलच ! " रंगराव मद्याचा प्याला दुसऱ्यांदा त्यांच्या पुढं ठेवीत म्हणाले.

" मी घेतों रे ! पण सुनंदेला हें कळलें तर ? " त्यांनीं आपली लाचारी व्यक्त केली.

" त्याची नकोस तूं काळजी करूं! सुनंदा वहिनीला ही गोष्ट कळणेंच शक्य नाहीं मुळी."

नंतर दौलतरावांनीं ते सोडामिश्रित मद्याचे प्याले क्रमवार आले तसे ओठाजवळ नेले व सावकाश रीत्या पिऊन संपवले.

" घ्या साहेब! त्यावर हें शेव, गाठ्या व चिवड्याचें मिश्रण फारच लज्जतदार लागते." मेजरसाहेब चिवड्याची बशी त्यांच्यापुढें सरकावीत म्हणाले.

आणि मग ते तिन्ही पिऊन तर्र झाले. त्यानंतर अशाच गप्पा-गोष्टींत त्यांनीं पुढें आलेल्या फ्रॉय मटन, ऑम्लेट, खिमा, कमोदी तांदळाचा भात अशा नानाविध सुग्रास अन्नावर ताव मारला व मग तांबूल भक्षण करून बहोत खूष होऊन दौलतराव मोटारीनं घरीं जायला निघाले.

---

## प्रकरण २ रें

प्रोफेसर दौलतरावांना घरीं येऊन पोहोंचायला रात्रीचे अकरा वाजून गेले होते. सुनंदा त्यांच्या येण्याचीच वाट पहात झोपाळ्यावर छोट्या अशोकला गाणीं म्हणून निजवीत होती. रात्रीला आठानंतर प्रोफेसर कुठं बाहेर गेले आहेत व सुनंदा त्यांच्या येण्याची उत्कंठेनं वाट पहात बसली आहे, असं कधींच झालं नाही. पण आज रात्रीचे अकरा वाजले तरी त्यांच्या येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना, म्हणून सहाजिकच ती चिंतातुर झाली होती.

बाळ अशोकला झोप लागल्यावर ती तशाच चिंतातुर मनानं दारा-जवळ जाई व ओटीच्या अगदीं कडेला उभी राहून लांबवर नजर टाकी.

पादचारी व वाहनें यांची वर्दळही आतां रस्त्यावरून मंदावली होती. प्रत्येक खेपेला लांबवर नजर टाकून व निराश होऊन ती परत दिवाण-खान्यांत येई व नसता चाळा करूं लागे. गेले आहेत प्रिय मित्राकडे जेवायला, तेव्हां सहाजिकच पाहुण्याकरितां बुद्धीबळाचा डाव मांडला असणं शक्य आहे, अशा विचारानं ती मनाची जराशी समजूतही करून घेई; पण एकटें रहाण्याची तिला संवय अशी मुळींच नसलेनें तिच्या मनाला स्वास्थ्य लाभणें शक्य नव्हतें. पण तिला अशा रीतीनें विरहदुःखाचा चटका फार वेळ सहन करावा लागला नाहीं.

बाहेर मोटारीचा हॉर्न वाजल्याचा आवाज आला व लगेच तोंडानं गोडशी शीळ वाजवीत व चांदीच्या मुठीची डौलदार काठी ठेक्यानं टेकीत दौलतराव आंतमध्यें येऊन दाखल झाले.

" इश्य ! किती वेळ झाला तो ! मला एकसारखी भीति वाटायला लागली होती ! " ती अधीरतेनं म्हणाली.

"अग, ग्वाल्हेरचे बडे पाहुणे आणि फार दिवसांनीं आलेले! तेव्हां काय विचारतेस तिथला नोक झोंक ? " ते अंगावरचा कोच काढीत म्हणाले.

" कशावर बेत होता मग ! श्रीखंड, केशरी भात कीं आपला मटन पुलावा ? " त्यांच्या हातांतला कोच स्वतःच्या हातांत घेऊन तो हँगरला लावीत तिनं विचारलं.

" अग, पाहुणे म्हणजे मेजरसाहेब होते. लष्करी नोकरींतला बडा अंमलदार श्रीखंडपुरीसारखें मिळमिळीत जेवण हातांत तरी धरील काय ? मंडालेच्या रणकंदनांत टोजोच्या जपानी सैन्याचा धुव्वा उडवून मेजर पदाला चढलेला बडा पाहुणा! तेव्हां त्याच्या इतमामाला साजेल असाच मराटशाही बेत होता तिथं ! फ्रॉयमटन, गिरेबी, ऑम्लेट, अंड्यांतील पिवळ्या बलकांची भर्जी, कलेजी, सुगंधी तांधळाचा मऊ भात...सारं सारं मराठ-शाही होतं तिथं...आणि आणखी काय होतं ओळख पाहूं ? " तिच्या अगदीं जवळ जाऊन मसाल्याच्या येत असलेल्या वासाचा उजवा हात तिच्या नाकाजवळ लावीत त्यांनीं विचारलं.

" इश्य ! हें काय ? ... हं ... समजलें मी आणखी काय होतं तें. त्या वासानं मला ओकारी आलीय् ! " त्यांच्यापासून झटदिशीं दूर होत ती म्हणाली.

" खरंच सुनू समजलीस तूं ? आज फार फार मजा आला रंगरावाकडे. आजच्याइतका आनंदाच्या अत्युच्च शिखरावर मी कधींच वागडलों नाहीं. सर्वांग कसं गोड शिरशिरीनं फुललं आहे. चल आपण गच्चीवर जाऊन चंद्रप्रकाशाची शोभा पाहूं, येतेस ? " ते आणखी तिच्याजवळ जाऊन म्हणाले. सुनंदा क्षणमात्र थांबली व नंतर म्हणाली,

" येतें ! पण खरंच, आज मला ह्या गोष्टीनं जराशी भीतीच वाटायला लागली आहे. कशाला घेतली आपण ती मदिरा ? आम्हां स्त्रियांना तरी ती एक प्रकारची सवतच वाटते. "

" किती खुळी आहेस तूं सुनू ! अग, बड्या पाहुण्यांच्या आग्रहाखातर थोडीशी मजेकरतां म्हणून घेतली. तेवढ्यानें मी पुन्हा कांहीं तिला हात लावणार नाहीं. तूं मुळींच त्याची चिंता करूं नकोस. चल, वर गच्चीवर जाऊं या ! "

आणि मग ते दोन्ही तात्काळ तिसऱ्या मजल्यावरील गच्चीवर जाऊन कितीतरी वेळ चंद्रप्रकाशाची अनुपम शोभा पहात राहिले.

दुसऱ्या दिवशीं नेहमींपेक्षां जरा लौकरच दौलतराव निजून उठले. त्यांनीं पुस्तिकेंत जाऊन दारूच्या दुष्परिणामावरील एक इंग्रजी पुस्तक वाचायला घेतलें. ' काल आपण दारू घेऊन पाहिली. काय वाटलें आपल्याला त्यामुळें ? ' त्यांनीं मनाशींच प्रश्न केला. ' लोक दारू कां पितात ? ' खरंच मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे हा !

त्यांनीं पुस्तक वाचायला म्हणून हातांत घेतलं; पण त्यांत त्यांचें लक्ष जराही लागेना. नेहमींच्या स्वास्थ्यांत, स्वभावाच्या दैनंदिन शांततेंत कांहीं तरी बदल झाला आहे; शांत जलाशयांत कुठून तरी छोटासा दगड पडून पाणी हेलकावत आहे असं वाटलं त्यांना. नेहमीं पुस्तक हातांत घेतांच त्यांतील मजकुराशीं तादात्म्य पावणारी त्यांच्या बुद्धीची अचल शांति कुठेंतरी

भरारी मारून निघून गेली होती आज. नजरेंतील ती शांत स्निग्धता, मजकुराची पकड घेणारी ती बुद्धीची चमक, आतां या वेळीं मुळींच ठिकाणावर राहिलेली नव्हती. फुलांतला वास निघून जावा व त्याचें निर्माल्य व्हावे तसें त्यांच्या बुद्धीचें या वेळीं झालें होतें. त्यांनीं जड मनानें जराशा त्रासिक अशा मनःस्थितींतच तें पुस्तक उजव्या बाजूकडील शेल्फवर भिरकावून दिलें आणि ते तसेच सुनंदा काय करते आहे तें पहाण्याकरतां स्वयंपाकघराच्या दाराजवळ येऊन गुपचुप उभे राहिले.

बाईसाहेब पोळ्या लाटण्याच्या उद्योगांत मग्न झाल्या होत्या. त्यांनीं जरासं वाकून चोरट्या नजरेनंच तिची हालचाल पाहिली. लहानशी पोळी लाटून होतांच तव्यावर भरार्दिशीं टाकताना तिची होणारी नयनरम्य हालचाल त्यांना मोठी विलोभनीय अशी वाटली. चुलीच्या उष्णतेनं तिच्या सर्वांगावर घामाचे बिंदू दाटून आले होते. विशेषतः कपाळावर व गालांवर घाम नुसता निथळून निघाला होता आणि तरीही त्याची तमा न धरतां ती भराभर पोळ्या करीतच होती. क्षणभर दौलतरावांना वाटलें, अस्सेंच जावे आणि आपल्या रुमालानें तिचा डवरलेला मुखचंद्रमा पुसून काढावा; पण विचार मनांत आला तसाच तो पळालाहि. कारण याच वेळीं बाजूला झोपी गेलेला अशोक ' आई, आई ' करीत उठला व त्यासरशीं सुनंदाही पोळपाट झटकून अलीकडच्या खोलींत लगबगीनें यायला निघाली.

" इश्श ! हें काय ? केवढे तरी चमकले मी ! चाहुल सुद्धां नाही लागली ती ! आणि रीडिंग रूममधून असं मध्येंच येणं कसं झालं तें ? कांहीं हवंय् का ? " सुनंदेनं आश्चर्य व्यक्त करीत विचारलं.

" नाहीं ! कांहींच नको मला सुनू ! पण काय असेल ते असो. आज माझें कशांतच लक्ष लागत नाहीं मुळीं ! बेचैन वाटतें आहे !" लाचार नजरेनं तिच्याकडे पहात ते म्हणाले.

" चहा करून आणतें मग; थांबा ! त्यानं जरा बरं वाटेल ! " अशोकला कडेवर घेऊन आंतमध्यें जात ती म्हणाली.

सुनंदा मोठी हुषार व 'त म्हणतां ताकभात' समजणारी होती. ती मॅट्रिक परीक्षा पास झालेली होती. चिडणें व धुसफूस करणें हा बहुतेक बायकांचा

स्वभाव ! जराशा गोष्टीनं फुरंगटून बसणें ही देखील बहुतेकांची लत; पण या साऱ्या दुर्गुणांचा तिच्या ठिकाणीं मागमूसही नव्हता. दौलतरावाच्या पदरीं तें एक रत्न पडलेलें होतें. लग्न होऊन पहिल्याच दिवशीं सुनंदेनं दौलतरावांच्या घरीं पाय टाकला व तेव्हांपासून प्रोफेसरसाहेबांचं घर एका नाविन्यपूर्ण चैतन्यानं बहरून निघालं. ' दौलतनिवास ' या ठिकाणाला राजप्रासादाची सुरूपता आली. तिचे सासरे पर्वतराव यांना तर असली गृहदेवता सून मिळाल्याबद्दल फार फार आनंद झाला. दौलतरावाना काय आवडतें व आवडत नाहीं, याचा पडताळा सुनंदेनं एकवार पाहून घेतला होता व जेणेंकरून त्यांची मर्जी प्रसन्न राहील अशीच वागणूक तिनं या वेळ-पावेतों ठेवली होती. साऱ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनाही दौलतरावांच्या या सुखी संसाराचा हेवा वाटे केव्हां केव्हा !

आणि मग त्यांच्या प्रीतीच्या आम्रवृक्षाला ' अशोक ' हें गोड फळ आलं व त्यांचा सोन्याचा संसार दीपज्योतींनीं उजळून निघाला. बाळाच्या बाराव्या दिवशीं दौलतरावांनीं पाण्यासारख्या पैसा खर्च केला. साऱ्या नातेवाईकांना व बड्या बड्या पाहुण्यांना मेजवान्या दिल्या. त्यांच्या दूरच्या बहिणी आल्या. साऱ्यांनी उभयता शंकर-पार्वतीला धन्य धन्य म्हटलं आणि त्या साऱ्या देखाव्यानं सुनंदेचं हृदय आनंदानं कांठोकांठ भरून आल होतं. कितितरी वेळ तिच्या नेत्रांत आनंदाश्रू उभे राहिले होते. सारं घर हंसण्यानं नुसं फुलून निघालं होतं !

आणि लागोपाठ रात्रीचा तो प्रोफेसरांच्या तोंडाला मद्याची वसकेन घाण आलेला प्रसंग तिच्या मनश्चक्षुपुढें उभा राहिला व तिचे डोळे लाग-लीच पाणावले. एरव्हीं अत्यंत आनंदी मनानं चहा करणारी सुनंदा या वेळीं जड मनानं चहाच्या आधणांत साखर व ऑरेंज-पी-कोच्या काड्या टाकीत होती. नेहमीं गोड गाण्यानं चाळवले जाणारे तिचे नाजूक ओठ या वेळीं तसेच जुळणी करून मलूल झाल्यागत दिसत होते. कपबश्यांच्या नाजूक खणखणाटानें व भारी चहाच्या वासानं दरवळणारं प्रसन्न वातावरण आज तिथं नव्हतं.

चहाचं आधण उकळत होतं. तसं तिचं अंतःकरणही उकळायला लागलं

होतं. तिच्या मनःचक्षुपुढें ज्या दिवशीं लग्न होऊन माहेरून ज्या दिवशीं आपली रवानगी सासरला झाली, त्या वेळचा प्रसंग उभा राहिला. बाबा, आई, भाऊ, सारे सारे म्हणत, 'जपून जा, जपून जा हं सुनू!' कशा भारावलेल्या अंतःकरणानं ते आपला निरोप घेत होते, ते सारे ओढ घेणारे निरोप अन् वेड लावणारें स्वागत, मैत्रिणींची ती गोड थट्टा! सारीं मायेचीं माणसं सोडायची वेळ होती ती. तें दृश्य सोडलें व आपली नजर सहजगत्या बाजूला वळली तों दुसरें दृश्य......इतकें सुंदर सासर अन् त्याहून असा सोन्यासारखा पति मिळणं हें केवढं भाग्य! नंतर गांवच्या वेशीला देवाला जोडप्यानं नमस्कार करतांना आपण मनाशीं म्हटलं, 'माझं तन, मन, धन माझ्या पतीच्या पायीं वाहिलं आहे. हें माझं वैभव असंच टिकूं दे!'

आणि मग संधान साधून इकडून हळूच आपला हात हातांत घेऊन म्हटलं गेलं, 'सुनू, खुशींत आहेस ना?'

'होय! अगदीं खुशींत!!' आपण म्हटलं आणि मग त्या सुखद क्षणाला आपल्या शरीराची नस न् नस, साऱ्या रक्तवाहिन्या पुरेपूर फुलून निघाल्या. मग पुनश्च जवळ कोणी नाहीं असं पाहून त्यांनीं हळूच आपल्या कोवळ्या लुसलुशीत करंगळींत हिऱ्याचा खडा बसविलेली डौलदार आंगठी घातली...अन् मग डोक्यावरचा भरघोस जरीचा टोप पदर हलकेंच दूर सारून...खरंच, धन्य धन्य झालों आपण त्या वेळीं! सुखाच्या पूर्णचंद्रानें आपल्या जीवनसिंधुला पुरेपूर भरती आली होती त्या वेळीं......

चहा उतू गेला व त्याचा जळका वास सर्वत्र पसरला अन् मग तिच्या लक्षांत आलं कीं, तें गोड स्वप्न पांच वर्षांपूर्वीचं जुनं झालेलं आहे. स्वतःशीं 'अगबाई, चहा केव्हांचा उकळला कीं' असें म्हणतच तिनं चहा गाळून ट्रे हातांत घेतला व ती तशीच दौलतराव बसले होते त्या ठिकाणीं येऊन दाखल झाली.

* * *

प्रोफेसर रंगरावाकडं दारू पिण्याचा बाप्तिस्मा मिळाल्यानंतर आज दुसऱ्यांदा प्रोफेसर दौलतराव त्यांच्याकडं स्वतः होऊन जायला निघाले होते.

त्यांना असं अकाल्पित आलेलं पाहून रंगरावांना जरासं आश्चर्यच वाटलं. कारण दौलतराव हे सहसा कधीं रिकामा वेळ घालवीत नसत. त्यांचा कॉलेजव्यतिरिक्तचा सारा वेळ त्यांच्या पुस्तकांनीं भरगच्च भरलेल्या रीडिंग-रूम मध्येंच जात असे. त्यांना पाहून रंगरावांनीं स्मित हास्यानं त्यांचं स्वागत केलं व पेपरतपासणीचा गठ्ठा तसाच हातावेगळा करून ते कोपऱ्यांतील दोन्ही आराम खुर्च्यांवर आसनस्थ झाले.

" हं, काय दौलतराव ! आज मध्येंच कुठं वाकडी वाट केलीस ती ? " त्यांच्यापुढं सिगारेट केस करीत रंगरावांनीं प्रश्न केला.

" तसं कांहीं विशेष काम नाहीं. पण म्हटलं आज जावंच रंगरावाकडं !" सिगारेट शिलगावीत त्यांनीं म्हटलं.

"त्या रात्रीं सुनंदा वहिनींना तूं मद्य घेतल्याचं कळलं का ? "

" हो तर ! तोंडाला आलेल्या वासानं तिनं तें तात्काळ जाणलं ! "

" मग रागावल्या असतील त्या ? "

" तसं प्रत्यक्ष कांहीं रागावली नाहीं. पण त्या दिवसापासून तिच्या चर्येवर काळजीची सूक्ष्म छटा मधून मधून स्पष्टपणें दिसून येते आहे. "

" आणखी कांहीं नवीन विशेष ? "

" दुसरं सांगण्यासारखं कांहीं नाहीं. पण खरंच रंगराव, त्या दिवसापासून माझं कामाकडे पाहिजे तसं लक्ष लागत नाहीं. शिकविण्यांतही थोडासा फरक पडलेला आहे व तो चाणाक्ष मुलांच्या आणि मुलींच्याही लक्षांत येऊन चुकला आहे. सुनंदा सुद्धां हें सारं मनाशीं समजून चुकली आहे. मित्रा, माझ्या सुखी जीवनांतून उडून चाललेली ही शांततेची सरिता, स्वास्थ्याची दीपमाळ, आनंदाची दिव्यज्योत, वैभवशाली संसारांतली भरल्या सुखाची मोट कायमची तर नाहींशी होणार नाहीं ? फारच काळजींत पडलों आहें मी ! बेचैन झालों आहें. तूंच कांहीं रस्ता दाखव मला ! " दौलतराव आपली भकास नजर रंगरावाच्या नजरेला भिडवीत म्हणाले.

" तुझ्या विचारांची मालिका इतक्या आडवळणाला गेली असेल याची नव्हती मला कल्पना ! असं व्हायला कारण तरी कोणतं एवढं जबरदस्त घडलं आहे ? " रंगरावांनीं सिगारेटचं थोटूक कुचकरीत विचारलं.

" तेंच नाहीं मला सांगता येत रंगराव ! पण खरं सांगतों, त्या रात्री-पासून जेव्हां मीं पाहिला मद्याचा घोट तुझ्याकडं घेतला तेव्हांपासून मला कांहीं एक सुचेनासं झालं आहे. वाटतं पुन्हा तिची लज्जत घ्यावी, एका निराळ्या दुनियेंत जराशी भरारी मारून यावं, बेहोष व्हावं व मग पळून जाणारा सौख्याचा ठेवा हिरावून आणावा ..."

" नुसती एक वेळ थोडीशी घेतल्यानं तूं एवढं पुराण सांगायला लाग-लास, तेव्हां तुझ्या कमकुवत मनाची कींव केलेलीच बरी ! माझ्या मनावर तर असल्या क्षुल्लक प्रकारांचा जराही परिणाम होत नाहीं. उलट सकाळीं उठून मी ताजातवाना होतों व नव्या जोमाने आपल्या कॉलेजच्या विश्वांत निमग्न होऊन जातो. एवढ्या क्षुल्लक प्रसंगाचा तुझ्या खंबीर मनावर असा विकृत रीतीचा परिणाम होईल याची नव्हती मला कल्पना. अशाने आप-ल्यांत व इतर असंस्कृत मनाच्या इसमांत फरक तो कोणता राहिला ?" रंगरावानीं नजर रोखीत म्हटलं.

एवढं जराशा हेटाळणीच्या स्वरात जरी रंगराव त्यांना बोलून गेले तरी त्यानीं समयसूचकतेनें आपली ही ओघानं घडलेली चूक तात्काळ सुधारली.

दौलतराव कांहींच बोलत नाहींत असं पाहून त्यानीं घरांत जाऊन थोडंसं इकडच्या तिकडे कांहींतरी केल्यासारखं दाखविलं व ते तसेच परत दौलतरावांजवळ येऊन बसले. दोन मिनिटें कोणीच कोणाशी कांहीं बोललं नाहीं. निःशब्द शांतता पसरली होती तिथं !

" हें पहा मित्रा ! " प्रो. रंगरावांनीं बोलायला सुरवात केली, " मनुष्यानं कोणतीही गोष्ट करावयाची असं एकदां मनांत आणलं म्हणजे, तिच्यां इष्टानिष्टतेचा कीस पाडीत न बसतां सरळ मनाला येईल तसं करून जावं हेंच बरं. माझंच पहा ना ! अमूक एक गोष्ट करावी असं माझ्या मनानं घेतलं म्हणजे लागलीच मी ती कसल्याही प्रकारची शंका-कुशंका न काढतां करून जातो. दारू प्यावी असं माझ्या मनांत आलं तर मी बिनदिक्कत ती पिऊन जातों व दुसऱ्या दिवशीं तिला विसरूनही जातों. म्हणच आहे ना, 'पाणी तेरा रंग कैसा, तो जिसमे मिलाया वैसा' आणि हें एक लक्षांत ठेव कीं, जो मनुष्य आपला ऱ्हास होऊं न देतां आपल्याला

सावरतो आणि समाजांतील सर्व तऱ्हेच्या रसरंगांचं पान करतो, तोच चारित्र्यवान मनुष्य होय. जीवन म्हणजे अठरा धान्यांचं कडबोळं आहे. हें कडबोळं खाऊन जो जिरवूं शकतो तोच खरा मनुष्य. बाकीचे मेषपात्र होत. चल, उठ मित्रा ! जाऊं वर ! अशा सुतकी चेहेऱ्यानं नको कुढत राहूंस !"

आणि मग वरच्या मजल्यावर जाऊन रंगरावानी ' ओल्डटॉम ' ची सुबकशी बाटली व त्या पाठोपाठ सुंदर कांचपात्रांचा सेटही बाहेर काढला. तें विलोभनीय दृष्य पाहून दौलतरावांच्या तोंडावर एकदम तजेला आला. एखाद्या कृपण मारवाड्याचा हरवला गेलेला धनाचा साठा अकस्मात त्याला दिसावा व त्या आनंदातिशयानं त्याचा चेहेरा फुलून निघावा, तसं त्यांचं झालं. रंगराव त्यांना या वेळेपुरते तरी देवासमानच वाटले. पूर्वी जेव्हां त्यांनीं पहिल्यानं मद्याचा प्याला ओठाला लावला, ती वेळ रात्रिची होती आणि आत्तांची ही वेळ दिवसाची होती. त्या वेळीं त्यांना तो वास असह्य झाला होता. हातरुमालानं त्यांनीं आपल्या नाकपुड्या गच्च दाबून धरल्या होत्या. थोडासा तिटकाराच वाटला त्यांना त्या वेळीं रंगरावाचा ! पण आत्ताचा आजचा या वेळचा प्रसंग उलट होता.

त्या सुंदरशा बाटलीचे बूच अलग होतांच जो वास तिथं सूक्ष्मपणे दरवळला, तो त्यांना अति आल्हाददकारक वाटला. एखादी रूपसुंदर यौवनबाला आपल्या झगझगीत पोषाखांत नटून थटून जात असलेली एखाद्या थिल्लर तरुणास दिसावी व मग त्यानें अगदी डोळे भरून तिच्या साऱ्या हालचालीकडं अनिमिष नेत्रांनीं पहात रहावं, क्षणिक उन्मादानं तिला आपादमस्तक न्याहाळावं, तसं त्यांनीं त्या टेबलावरच्या नक्षीदार बाटलीला व तिच्यांतील लालंलाल मद्याला न्याहाळलं, प्रेमळ दृष्टीनें पाहिलं.

सारं स्वर्गसुख तिथं त्या रंगरावाच्या टेबलावर ओतलं जात आहे असं वाटलं त्यांना. एका अननुभूत आनंदाची उर्मी उसळून आली त्यांच्या हृदयांत.

बस्स् ! आतां बेहोष होणं ! मनाची ही बेचैन अवस्था घालविण्याकरतां बेहोष होणं, एवढा एकच राजमार्ग आपणाला मोकळा आहे. " हं, घ्या दौलतराव करा सुरवात ! " प्याला त्यांच्यापुढं करीत रंगराव म्हणाले.

प्याला ओठाआड होऊन रिता केव्हां होतो याचीच दौलतराव उत्कंठेनें वाट पाहात होते.

पाहिला ग्लास त्यांनीं तात्काळ पिऊन रिता केला व त्यांच्या दुखावलेल्या मनाला स्फुल्लिंग मिळाला. क्षणभरानं त्यांची रसवंती पाजळूं लागली. ' माणूस बेहोष कां होतों ' व 'माणसाला दारूची जरूरी कां आहे ' या विषयांवर ते अस्खलित भाषण करूं लागले— " खरंच मित्रा, माणसं बेहोष कां होतात याचं उत्तर मला आतां स्वानुभवानं मिळालं आहे. प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत जरासं डोकावून पाहिलं, तिच्या अंतर्मनाच्या खोल कप्प्यांत जरासा दृष्टिक्षेप केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, तेथें कशाशीं तरी झुंज चालली आहे. सुखाच्या आभासाच्या मृगजळामागं व्यक्तीचं मन सैरावैरा धांवत आहे. जीवनांत अमुक एक गोष्ट करावी, अमक्या तमक्या मार्गानें जावें, ठराविक चाकोरींतून जीवननौका पैलतीरीं न्यावी, अशी प्रत्येक व्यक्तीची सदसद्विवेक बुद्धी तिला बजाऊन सांगत असते आणि अगदीं या टोचणीच्या वेळींच ती गोष्ट करणें, त्या मार्गानें जाणें अगदीं अशक्य आहे अशी प्रचीती तिला येते. ही अशक्यता तिला तिच्या अंतर्यामांत कोणीतरी पटवीत असतें. एखादी गोष्ट बरोबर असावी, ती कळावी व मनास पटावी; तोच मार्ग बरोबर आहे हें स्पष्ट समजावें; आणि तरी ते आपणांस जमणार नाहीं असें वाटावें; जमूंच नये असें व्हावें व असें झालें कीं,मग साहाजिकच त्याबद्दलचें व्यक्तीच्या अंतःकरणास तीव्र दुःख होतें. मग या दुःखांतून सुटावें कसें ? या मनःक्षोभांतून, पारिस्थितीच्या बोचणींतून सुटण्याचा मार्ग कोणता ? जें अशक्य आहे असें वाटतें, तें खरोखरच अशक्य आहे काय ? कां नुसताच आभास आहे तो ! याबद्दलचा निर्णय लावणेचें कार्य त्या व्यक्तीचें मन धडपडीनं करीत असतें."

हें वर्णन सांगत असतां दौलतराव सराईत व्याख्यात्याप्रमाणें हावभाव करीत होते. त्यांची रसवंती नुसती पाझळून निघाली होती. डोळ्यावर लाली चढली होती. त्यांनीं पुढें पडलेल्या सिगारेट केसमधून एक हातांत घेतली व तिला पेटवून तिचे जोरदार झुरके घेण्यास सुरवात केली.

रंगराव मनाशीं समजून चुकले कीं, आतां दौलतरावांचा हा आवेग लौकर आटोपणें शक्य नाहीं. घड्याळांत अकरा वाजून गेले होते, व आणखी अर्ध्या तासानें त्या उभयतांना निरनिराळ्या कॉलेजांत आपापल्या ड्युटीवर जावयाचें होतें.

रंगराव पूर्णपणें भानावर होते; पण दौलतराव भानावर नव्हते. त्यांना पुन्हा पिण्याचा मोह होत होता. त्यांनीं सिगारेट पिऊन झाल्यावर स्वतःच्या हातांत मद्याची बाटली घेतली व ते आग्रहानं रंगरावांना एक प्याला देऊन दुसरा क्रमवार आपल्या घशांत ओतूं लागले. आजचें लक्षण ठीक नाहीं, असें पाहून धूर्त रंगरावांनीं आपल्या कॉलेजांत व प्रो. दौलतरावांच्याही कॉलेजांत सिकनोट पाठवून दिली, आणि फोनवरून सुनंदेला प्रोफेसरांच्या येण्याची वाट न बघण्याचा निरोपही कळवून दिला.

एवढें काम झाल्यावर आतां रंगरावही दौलतरावांची ती क्षणाक्षणाला पाझरूं लागलेली रसवंती ऐकण्यास मोठ्या औत्सुक्यानं त्यांच्या बाजूला तोंड करून आसनस्थ झाले. त्यांनीं मनाशीं म्हटलें, ' खरंच, अतिवाचनानं या गृहस्थाची प्रगति किती उच्च शिखराला जाऊन पोहोंचली आहे.' मूळचें अभिजात वक्तृत्व, सांठविलेलें अमोल किंमतीचें ज्ञान, तें नाना ग्रंथांच्या वाचनानं तुडुंब भरून राहिलेलं ज्ञानाचं तळं ! केवळ संकोची स्वभावानं तसंच झाकण बंद केल्या स्थितीप्रमाणें खोल कप्प्यात बंदच राहिलं असतं. त्याची वाट मोकळी करायला मद्याचा प्याला हाच एक अचूक उपाय ठरावा याचेंही त्यांना मनाशीं नवल वाटूं लागलें. अशा परिस्थितींत जर यांना एखाद्या प्रचंड सभेच्या व्यासपीठावर नेऊन उभें केलें तर खात्रीनं ते सारी सभा तेव्हांच जिंकून सोडतील, साऱ्या प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करून टाकतील, अशा विचारांची मालिका तेवढ्या वेळांत रंगरावांच्या अंतःचक्षुपुढून झरझर सरकून गेली व त्यांनीं परत ताज्या दमानं प्रो. दौलतरावांना होकार भरण्यास सुरवात केली.

दौलतराव सांगूं लागले, " कोणतेंही कार्य करण्यास माणसानें सुरवात केली म्हणजे, त्यापूर्वी तो त्याच्या यशाच्या शक्याशक्यतेचा विचार करीत नाहीं. तो कार्याला सुरवात करण्यापूर्वीच त्याबद्दलचें यश निश्चित आहे

असें गृहीत धरून चालतो आणि अशा परिस्थितींत जर तें यश दुरावलें, तो पूर्णपणें त्या कार्यांत अपयशी झाला तर त्या निराशेची बोंचणी त्याच्या मनाला एकसारखी अस्वस्थ करीत असते आणि असें अपयश स्वीकारण्याचे प्रसंग लागोपाठ त्याच्यावर आले म्हणजे साहजिकच त्या तडाख्यामधून सुटण्याचा—त्याचा कांहीं काळ तरी विसर पडण्याचा मार्ग तो हुडकीत असतो आणि मग सहाजिकच त्याला ' बेहोष होणें ' हाच एक मार्ग अति उत्तम म्हणून पसंत पडतो बेहोष होण्यानें त्याच्या बुद्धींतला सद्पणा ठार मारला जातो व हें करणें चांगलें नाहीं, तसं करणें वाईट आहे, अशा अनुकूल-प्रतिकूल विचाराची बोचणी त्याच्या मनात शिल्लकच रहात नाहीं. उदा:—एखाद्या इसमाच्या मनांत आलें कीं, आपला शत्रू सोमाजी गोमाजीचा खून करावा ! पण त्याच्या मनांत जो कांहीं विवेकबुद्धीचा मूळचा अंश असतो, तो त्याला डिवचून सागत असतो कीं, तूं असें करणें चांगलें नाहीं; फार वाईट आहे ते ! पण अंत:करणामधला दुसरा कप्पा पूर्वीच्या घटनांचा संताप त्याला कायमचा अस्वस्थ करीतच असतो, नव्हे क्षणाक्षणाला तो त्याला चेतवीतच असतो.

" मग त्याच्या मनांत सूड घ्यावाच-खून करावाच-या विचाराची ' हो ' आणि ' नाहीं ' यांच्या द्वंद्व युद्धांत सरशी होते. मग विवेकबुद्धीची ' नाहीं', ' नको करूंस तसें ' ही बेचैन करणारी भुणभूण घालविण्यासाठीं तो दारू पितो व मग त्या नादांत अगदीं बिनदिक्कत त्या आपल्या शत्रू व्यक्तीचा खून करून मोकळा होतो. "

एवढें बोलून दौलतराव जरा थाबले. रंगराव त्याचें म्हणणे अगदीं एकाग्र चित्तानें ऐकत होते. दौलतरावांनीं असल्या प्रकारचें हृदयाचा ठाव घेणारें भाषण कितीतरी वेळ एकसारखें करीत रहावें व आपण त्याचा मनसोक्त आस्वाद घेतच रहावे असें त्यांना त्या वेळीं फार वाटलें. त्यांच्या गाढ विद्याव्यासंगावर ते बेहद्द खूष झाले. त्यांच्या तोंडांतून अशीच रसगंगा सतत वहावी व आपण त्या ज्ञानजलात पवित्र व्हावें असेंच त्यांना त्या वेळीं तरी तीव्रतेनं वाटलं.

" आण बुवा आणखी. तोंड कोरडें पडायला लागलें बत्र ! ", दौलत-

राव म्हणाले.

" पण मला वाटतें, आतां नकोच ! बराच वेळ झाला आहे. घरीं सुनंदा वहिनी काळजी करीत असेल. मलाही घरांतून दोनतीनदां बोलावणें आलेंच आहे ! " रंगराव म्हणाले.

" तें कसेंही असलें तरी आणखी एक बाटली तरी या बैठकींत संपायलाच पाहिजे. एवीतेवीं सिकनोट कॉलेजांत रवाना झालेली आहेच ! मी सांगूं का रमावहिनींना जाऊन ? " दौलतराव खुर्चीवरून उठत म्हणाले.

" नको ! असला प्रकार घरांत चालला म्हणजे तिला नाहीं खपत ते ! आतां तर नाहीं; पण तूं गेल्यावर माझी चांगली खरडपट्टी काढल्याशिवाय नाहीं रहाणार ती. तेव्हां तिला हांक न मारलेलीच बरी. खरंच, त्या बाबतींत तूं मात्र भाग्यवान आहेस बुवा ! सुनंदा वहिनी म्हणजे रत्न आहे एक. तूं जरी अशा स्थितींत घरीं गेलास तरी माझी खात्री आहे कीं, ती तुला एका शब्दानेंहि दुखावणार नाहीं म्हणून ! पण माझें तसें नव्हे रे; पण आपलेंच चुकतें तेथें त्यांना तरी दोष का द्या ? पण आतां उठावेंच असें वाटतें मला. आणखी पुन्हा कधींतरी ठरवूं हा बेत ! " रंगराव खुर्चीवरून उठत म्हणाले.

" नाहीं ! रंगराव, अजून मला बरंच बोलायचंय् तुझ्याशीं. ज्या दिवशीं मी पहिला स्पर्श मद्याला केला, तेव्हांपासून मला काय वाटतंय् याचा मी सूक्ष्म रीत्या विचार केला आहे आणि पुन्हा पुन्हा विचार करून एक सिद्धांत मनाशीं ठरविला आहे. ' माणूस दारू कां पितो ' याचा मानसशास्त्रदृष्ट्याही मी विचार करीत आहे. चालू असलेल्या माझ्या वैचारिक संशोधनांत, चिकित्सक विचारसरणींत एका नवीन मार्गाचा मी शोध करीत आहें व त्यांत मला तुझें सहाय्य हवें आहे. करशील ना तें मला ? " ते म्हणाले व त्यांनीं तसेंच आपल्या कोटाच्या आंतील खिशांतून पैशांचें पाकीट बाहेर काढलें आणि त्यांतून दहादहांच्या तीन नोटा काढून त्या रंगरावांच्या पुढं करीत म्हटलं, " घे ! मागव आणखी, आणि होऊन जाऊं दे आज या वेळीं ! "

रंगरावांचा त्यांच्या अशा बोलण्यापुढं नाइलाज झाला. त्यांनीं मग

गड्याकरवीं पुन्हा ' मसीरा ' दारूची एक पेक बाटली मागविली व सोबत ऑम्लेट आणि कांद्यांचीं गरमागरम भजींही ! आणि मग पुन्हा दौलतरावांची रसवंती नाविन्यानं पाझळूं लागली. ते सांगूं लागले, " माणूस बेहोष कां होतो या विषय'वर एक उदाहरण देऊन मी तुला थोडेसें सांगितलें. पण तें झालें अमूक एका व्यक्तीच्या सूड उगविण्याच्या खुनशी बुद्धीबद्दलचें. पण खुनासाठींच माणूस जास्त मद्यपान करतो असें नव्हे. बेहोष करणारी दारू व तिच्यासारखीं जीं दुसरीं मादक द्रव्यें आहेत त्याचें सेवन करणारे सर्वेचजण कांहीं अपकृत्य करण्यासाठीं बेहोष होत नाहींत. निर्हेतुक दृष्टीनं बेहोष होणारेही असंख्य लोक समाजात आहेत. दरिद्री स्थितींत जन्माला आलेलेही लोक बेहोष होतात. त्यांच्या मनःचक्षुपुढं बेहोष होण्यांत हाच एक हेतू प्रामुख्यानं असतो तो म्हणजे, ' आपल्या दारिद्र्याचा विसर पडणें.'

"दरिद्री माणूस जेव्हां दारू पितो तेव्हां त्याला आपल्या दरिद्री संसाराचें तें दरिद्री दृश्य स्पष्ट दिसत असतें. उपाशी मरत असलेलीं बायकामुलं दिसतात, कपड्याविना उघडीं नागडीं असलेलीं आपलीं कोवळीं अर्भकें दिसतात! अंगावर ठिगळाचें कसेंतरी चिरगूट ल्यालेली बायको दिसते. ती हातभर खोली, दोनचार गाडगींमडकीं– हें करुणाजनक दृश्य त्याला स्पष्ट स्पष्ट दिसतं. मग त्याची मूळची माणूसधर्माची सद्‌बुद्धी त्याला हळूच म्हणते, ' फेक तो दारूचा प्याला जमिनीवर ! नको हात लावूंस त्याला ! सत्यानाश होईल त्यांत तुझा ! ! ' पण दारिद्र्याच्या असंख्य इंगळ्या त्याच्या हृदयाला सर्वांकडून सतत चावा घेतच रहातात आणि मग त्या दुःखाच्या डोंगराच्या अखेरच्या उंच कड्यावर तो उभा असतांनाच त्वेषानं आणि चिडखोरीनं उद्गारतो, ' हो, माहीत आहे मला तें सारं तत्त्वज्ञान ! कळतं बरं मला तें चांगलं ! ! नका त्याचा पुन्हा पुन्हा पाढा वाचूं माझ्यासमोर ! ' व मग, तो वटवटीचा मार्ग बंद करण्यासाठीं दारिद्र्याच्या त्या यमयातना कांहीं काळ तरी विसरण्यासाठीं तो दारू पितो, बेहोष होतो, धुंद होतो; आणि जगाच्या नेहमीच्या रामरगाड्यापासून क्षणभर स्वतःच्या मनाची सोडवणूक करून घेतो. अशा या सोप्या व

सुटसुटीत मार्गाचा त्यानं एकदां अवलंब केला म्हणजे पुन्हा पुन्हा होणारा मनस्ताप टाळण्यासाठीं तो याच एका मार्गाचा वारंवार अवलंब करीत रहातो.

" हं, नुसतें बोलण्यांतच नका राहूं राव ! जरा याचाही आस्वाद घ्या कीं ! " भज्यांची प्लेट त्यांच्यापुढं सारीत रंगराव म्हणाले.

" अरे हो ! तें तर विसरलोच ! " असें म्हणत दौलतरावांनीं भजीं व ऑम्लेट यांचा जरासा समाचार घेतला.

" खरंच दौलती, तूं दारूबद्दल बराच बारीक रीत्या विचार केलेला दिसतोस. आत्तांचे तुझे हे सारे विचार व स्पष्टीकरण ऐकून मी तर चाकितच झालों. तुझ्या बुद्धीची व सूक्ष्म निरीक्षणशक्तीची करावी तेवढी स्तुति थोडीच होणार आहे ! पण मला एक अति महत्त्वाची सूचना तुला करा-वयाची आहे. ती मग यथावकाश मी करतोंच. " एवढें बोलून रंगराव आपलीं तेलकट झालेलीं बोटं पाण्यानं धुवूं लागले.

इतक्यांत रमाबाई तिथं येऊन थडकल्या व मग त्या दोघांचें बोलणें तिथंच एकदम स्टॉपप्रेस झालें. रमाबाईचा तो रुद्रावतार पाहून दौलतरावहि जायला उठले. त्यांनीं आपल्या पठाणी सँडल्स घाईघाईनें पायांत घातल्या व कोपऱ्यावर टेकलेली आपली छडी हातांत धरून ते लगबगीनें घरीं जायला निघाले.

— — —

## प्रकरण ३ रें



आज दौलतराव मोठ्या खिन्न मनानेंच कॉलेजांत येऊन दाखल झाले. घरून निघतांनाच त्यांचा मनस्ताप पराकोटीला गेला होता. सुनंदेनं आपल्याला उपदेश करावा व शरमेनं खालीं मान घालण्याची पाळी आणावी याचें त्यांना फारच वैषम्य वाटत होतें. उलटसुलट विचारांचें वादळ त्यांच्या मनांत गर्दी करीत होतें. त्यांचें एक मन म्हणत होतें, खरंच, सुनंदा म्हणतें यांत चुकीचें असें काय आहे बरें ? आपण दिवसेंदिवस दारूच्या आहारीं जात चाललों आहोंत, कामकाजाकडे आपलं लक्ष नसतं, जेवण कमी झालं आहे, वाचनांत तर मुळींच लक्ष लागत नाहीं, कॉलेजांतले तास कसेतरी पार पाडून आपण सरळ दारुड्या मित्राकडं जातों व मध्यरात्रीपर्यंत घरीं न येतां कुठेंतरी हलक्या प्रतीच्या लोकांत दारूनं धुंद होऊन पडून रहातों. या साऱ्या आठवणी त्यांच्या मनाला एकापाठोपाठ एक अशा दंश करूं लागल्या.

ते आले तसे सरळ चेंबरमध्यें न जातां लायब्ररीच्या हॉलमध्येंच येऊन एका खुर्चीवर आसनस्थ झाले. त्यांच्या चर्येवर प्रसन्नतेची जराहि छटा दिसत नव्हती. दृष्टी रोडावलेली व शुष्क अशी दिसून येत होती. या वेळीं तिथं दुसरं कोणीहि हजर नव्हतं. दौलतरावांनीं समोरच्या मोठ्या घड्याळाकडे पाहिलं. त्यांचा इतिहासाचा तास सुरू व्हावयाला अजून दहा मिनिटांचा अवधि होता. पण त्यांच्या बेचैन मनाला तेवढाहि वेळ फार जास्त आहे असं वाटूं लागलं. त्यांनीं मनाशीं म्हटलं, ' कॉलेज सुटल्यावर सरळ सोनाजीकडे जायचं. आज आज खूप खूप प्यायची. सुनंदेनं मला असं नको नको तें बोलावं म्हणजे काय ? आणि रंगराव देखील मला उपदेश करायला लागला अं ? जणू काय सर्व सद्गुणांचा पुतळाच ! '

अशा रीतीनें ते स्वतःशीं विचार करीत आहेत तोंच तास सुरू झाल्याची घंटा वाजली व ते तसेच आपल्या वर्गांत जाऊन ड्युटीवर हजर झाले. पण अलिकडे त्यांच्या पाठांत पूर्वीसारखा रसाळपणा विद्यार्थ्यांना वाटत नव्हता.

ते कांहींतरी बोलायचे म्हणून बोलतात अशी साऱ्या विद्यार्थ्यांची व विद्यार्थिनींची खात्री झाली होती आणि म्हणूनच ते सारे त्यांच्या तासाला कंटाळलेले दिसत असत. तशांत ते अलिकडे दारू पिऊन धुंद असतात अशी वार्ता सर्व कॉलेजभर प्रसृत झाली असलेनें त्यांच्याविषयींचा पूर्वीचा पूज्यभाव कोणाच्याहि मनांत राहिला नव्हता. जो तो त्यांच्याविषयीं कुचेष्टेनं बोलूं लागला. लेक्चर देताना ते असंबद्ध बोलूं लागले होते. त्यांच्या तोंडाला वारंवार कोरड पडल्यासारखें होऊं लागलें आणि त्यांची ती दुष्ट नजर वारंवार विद्यार्थिनींच्या बाजूकडंच लागलेली उघड दिसून येऊं लागली. लेक्चर चालूं असतांना मधूनच एखादी शंका विचारली गेल्यास ते साऱ्या वर्गावर चिडून बोलत. त्यांच्या वागण्यांतील हा फरक–तुसडेपणा–दुसऱ्या साऱ्या प्रोफेसरांच्याहि लक्षांत येऊन चुकला होता. एवढेंच नव्हे तर त्यांच्या अशा वर्तनाबद्दलचा रिपोर्टहि वरिष्ठाकडे जाऊन दाखल झाला होता.

हे घडत असलेले प्रकार–होत असलेल्या गोष्टी–दौलतरावांना समजत नव्हत्या असें नाहीं. पण हें सर्व समजूनहि त्यांना तेंच तेंच करीत रहाण्यांतच मौज वाटत होती. प्रो. रंगरावाकडं दारू पिण्याची सोय भरपूर होत नाहीं यामुळे त्यांनीं आतां हलक्या प्रतीच्या लोकांची संगत त्याकरतां धरली होती. सोनाजी हा मिलमधील जॉबर होता. त्याच्याकडं रात्रीच्या वेळेला दारुड्याची मैफल भरत असे. तिथं दौलतरावांनीं प्रवेश मिळविला. असल्या मोठ्या प्रकारचें सावज आपल्या जाळ्यांत आपणहून आल्याबद्दल सोनाजीला व त्याच्या साऱ्या दारुड्या मित्रांना फार फार आनंद झाला. दररोज दारूचा सारा खर्च दौलतरावांकडूनच होऊं लागला. त्यांच्या उदार स्वभावाचें वर्णन ते सारे दारुडे मित्र तोंडभरून करूं लागले.

वर उल्लेख केल्याप्रमाणें दौलतरावांनीं कसाबसा आपला तास संपवला व ते कॉलेज सुटल्यावर घरीं न जातां सरळ सोनाजीच्या अड्ड्यावरच जाऊन दाखल झाले. मिल सुटायला अजून थोडा अवधि होता. सोनाजी तिथं येऊन दौलतरावांच्या हाताशीं हात मिळवायला अजून अर्ध्या तासाचा अवधि तरी निश्चितच होता. पण तेवढाच वेळ त्यांना एका दिवसाइतका मोठा वाटला. ते आले त्या वेळीं सोनाजीची बायको देवकी ही घरीं होती.

घरांत बसून एका फाटक्या गोधडीला ठिगळ लावण्याचा उद्योग ती करीत होती. प्रोफेसरांना दारांत आलेले पहातांच तिनं लाजून हातांतलं काम बाजूला ठेवलं व ती उठून उभी राहिली.

" आला नाही का अजून सोनाजी? " कांहींतरी बोलायचं म्हणून ते बोलले.

" नाहीं ! अजून गिरणी सुटायला लई वखत हाये ! " तिनं खालीं मान घालून म्हटलं.

" मग मी जातो तिकडंच. "

" पण साहेब, एक इनंति करूं का ? राग तर नाहीं येनार गरिबाचा ? " ती चाचरत म्हणाली.

आतां ती काय म्हणणार हें दौलतराव तात्काळ मनाशीं समजून चुकले. आपण सोनाजीबरोबर दारू पितों हें वाईट आहे असंच ती सांगणार.

" सांग काय तें !" ते कसेबसे म्हणाले.

" हें पहा साहेब, असं समदी रात दारू पिनं अन् मग झिंगूनशान घरीं जाणं तुमच्यासारख्यास्नी नाहीं शोभत ते ! तुम्ही साहेब, जरा इचार करा याचा. तुमच्या नादानं ह्योबी लागला लई चळायला म्हून सांगते, नका येत जाऊं इथं. दया करा गरिबावर. घरीं तुम्हास्नीबी संसार आहे. सोडा आतां ही अवदसा..."

एवढें म्हणत आहे तोंच देवकीच्या डोळ्यांतून अश्रू टिपकले. दौलतरावांना तें बोलणे ऐकून स्वतःची स्वतःला फार शरम वाटली. त्यांनीं लाजेनं त्या वेळीं मान खालीं घातली. त्यांना त्या गरीब बाईला कांहींच उत्तर देतां येईना.

" खरं आहे देवकीबाई ! तूं म्हणतेस हें सर्व अक्षरशः खरें आहे. हा मी घरीं चाललों पहा. "

असें म्हणत ते खरोखरच सरळ घरीं येऊन दाखल झाले. त्यांना आज असं लौकर आलेलं पाहून सुनंदेला जरासं आश्चर्यच वाटलं;पण त्यांतल्या त्यांत मनाशीं आनंदही झाला. अलीकडे त्यांची होत असलेली अधोगति पाहून तिच्या अंत:करणाला पीळ पडत होता. आपला सोन्यासारखा सुखाचा संसार

या दारूमुळं धुळीला मिळणार या चिंतेनं तिला रात्रंदिवस घेरलं होतं. दौलत-रावांची दारू सुटावी म्हणून तिनं नाना तऱ्हेचे प्रयत्न करून पाहिले. प्रत्यक्ष त्यांची सौम्य शब्दांत कानउघाडणीहि केली. पण कशाचाहि उपयोग होत नव्हता. दारू सुटण्याचें तर दूरच राहो; पण ते जास्त जास्तच तिच्या आधीन होत चालले होते. “ खरंच सुनू, आज मला माझ्या वर्तनाबद्दल पूर्णपणें पश्चात्ताप झाला आहे. एका सामान्य मिलमजुराच्या अशिक्षित स्त्रीनं मला धिक्कारावं, उपदेश करावा, इथं येत जाऊं नका म्हणून म्हणावं—छे ! काय हें माझें जीवित ! हे सारं या दारूमुळें झालं. खरंच, आता या दारूचं नांव पुन्हा फिरून घ्यायचं नाही. हात नाहीं लावायचा मी यापुढं दारूला. सुनू...लाडके, आण तो काचेचा प्याला... ”

आणि असें म्हणतच त्यांनी कपाटांतून स्वहस्तें मद्याच्या रिकाम्या बाटल्या व नव्यानं खरीदलेलीं सारीं कांचपात्रें बाहेर काढलीं व खालच्या दगडी फरशीवर आपटून त्यांचे तुकडे तुकडे करून टाकले. काचेचे तुकडे साऱ्या खोलीभर इतस्ततः पडले व तें दृश्य पाहून त्यांच्या दुखावलेल्या मनाला जरासं समाधान वाटलं. सुनंदेलाहि हा प्रकार कां झाला, यक्षिणीची कांडी फिरवावी तसा हा अचानक बदल त्यांच्या मनांत एकाएकीं कां व कसा घडून आला, याचा उलगडा होईना. पण जें झालें तें सर्व आनंदाचें आहे या विचारानं तिच्याहि चर्येवर एक प्रकारचा अननुभूत आनंद ओसंडून निघाला. ती त्यांच्या जवळ जाऊन प्रेमळपणानं म्हणाली, “ खरंच, आतां पुन्हा दारूला शिवणार नाहीं ना ? किती छान निश्चय हा ! खरंच प्रभू रामचंद्रांना माझी हाक लौकर ऐकूं गेली तर ! काय तरी मेलं तें जिणं होतं. ना कधीं बाळाला घेणं, कीं त्याचं कौतुक करणं ! ना कधीं घड दोन घास समाधानानं खाणं. सारा आनंद कसा पार उडून गेला होता तो. प्रकृति देखील किती वाळली; पहावत-सुद्धा नाहीं चेहेऱ्याकडं. बाई अंबाबाई, खणानारळांनीं तुझी ओटी भरीन ग ! नको पुन्हा ही अवदसा आठवूं देऊंस. ”

असं म्हणत असतांच तिच्या स्नेहार्द्र डोळ्यांत अश्रू गर्दी करून आले आणि तिला रडतांना पाहून दौलतरावांनाहि नाहीं राहवलें. त्यांनाहि गहि-

वर आला. त्यांनीं तिला हृदयाशीं धरलं व मग एवढा वेळ प्रयासानं दाबून ठेवलेल्या अश्रूंना सुनंदेनं अगदीं मोकळी वाट करून दिली. दोघेही रडले.

सारा दुःखभार हलका झाल्यावर ते दोन्ही झोपाळ्यावर जाऊन बसले. छोटा अशोक जवळच्याच नवारीच्या पलंगावर गोड झोपेच्या आधीन झाला होता. दौलतरावांनीं त्याच्या जवळ जाऊन त्याला उठविलं व त्याचे तशा स्थितींतच अधाशासारखे पटापट मुके घेतले.

" खरंच आतां पुन्हा दारूला स्पर्श नाहीं करणार ना ? " ती त्यांच्या नजरेला आपली स्नेहार्द्र नजर भिडवीत म्हणाली.

" वेडी ! पुन्हा शंकाच घ्यायची का ? अगदीं शपथ घेऊन सांगतो, पुन्हा दारूला हातहि लावणार नाहीं ! " ते म्हणाले.

" माझ्या गळ्याची शपथ ? " तिनं त्यांच्या खांद्यावर हात ठेवीत विचारलं.

" खरंच सुनू! अगदीं शपथेवर सांगतों. तुझ्या गळ्याची शपथ, आतां पुन्हा दारूला शिवणार नाहीं मी ! " त्यांनीं निश्चयी स्वरांत म्हटलं.

त्या दिवशीं रात्रीं सुनंदेचा आनंद गगनांत मावेना. दौलतरावांना कोठें ठेऊ व कोठें नाहीं असें तिला होऊन गेलें. आपल्या संसारांतील उडून जाणारा आनंदाचा ठेवा अशा अकल्पित रीतीनं आपणांला परत मिळेल ही कल्पना तिला आलेली नव्हती. लग्नापूर्वीं व नंतर आपण मनाशीं योजलेल्या असंख्य आशा-आकांक्षा, सारे मनोरथ, सारं सारं कांहीं धुळीला मिळालं असं तिला वाटत होतं. पण आजच्या प्रकारानं पुन्हा तिच्या त्या सुकून गेलेल्या आशावेलींना नवीन टवटवी आली होती. सारं स्वर्गसुख आपल्या घरांत परमेश्वरानं ओतून दिलं असं वाटलं तिला.

" इश्श ! हें काय ? केव्हांची बसूनच राहिलें मी ! चहासुद्धां नाहीं दिला तो ! चला, उठावं. गरम पाण्यानं तोंडहात धुवावं; तोंवर चहा आणतेंच मी ! " तिनं भानावर आल्यासारखं करून म्हटलं.

" नको सुनू ! उठूं नकोस तूं इथून. अश्शीच माझ्या जवळ रहा. एक क्षणहि तूं माझ्यापासून दूर जातां उपयोगांचें नाहीं ! खरंच, तूं देवता

आहेस. तुझ्या पादस्पर्शानं तरी मी पुनीत होईन. "

" इश्य ! हें काय असं बोलणं ? "

आणि एवढ्यांत बाळ अशोकनं जोरानं रडायला सुरवात केली व त्याची समजूत घालण्याकरतां त्याला कडेवर घेऊन ती आंतमध्यें निघून गेली.

पण सुनंदेचा हा आनंद तेवढ्या दिवसापुरताच क्षणिक ठरला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं चहापानानंतर दौलतराव आपल्या दिवाणखान्यांत नेहमींप्रमाणें आरामखुर्चीवर बसून सिगारेटचे झुरके घेत होते. आंतमध्यें सुनंदा घरकामांत दंग झाली होती. इतक्यांत पोस्टमन तिथं तारेचा एक लिफाफा घेऊन आला. जड हातांनींच सही करून प्रोफेसरांनीं तो लिफाफा फोडून वाचला. त्यांत त्यांना प्रोफेसरीच्या ड्युटीवरून बडतर्फ केल्याचा मजकूर होता. मजकूर वाचून त्यांच्या चर्येवर जराशीं खिन्नतेची छटा उमटली. इतक्यांत लगबगीनं सुनंदाही तिथं येऊन दाखल झाली.

" मला कॉलेजच्या ड्युटीवरून बडतर्फ केल्याची ऑर्डर आलीय ! " ते जड शब्दांनीं तिला म्हणाले.

"अस्सं होय ? कांहीं हरकत नाहीं. त्याबद्दल मनाला कांहींच लावून घेऊं नये. दुसरी नोकरी पाहूं या कुठं, किंवा घरची प्रॉपर्टी आहेच देखरेख करायला. नका त्याचं दुःख मानूं एवढं ! " ती अभिमानानं म्हणाली.

" पण खरं म्हणजे हा माझ्यावर अन्याय आहे. त्या मूर्ख भाव्याच्या रिपोर्टावरून हा सारा बनाव घडून आला आहे. बरं म्हणावं बच्चमजी ! डोळे उघडून नाहीं पहाणार तुला तर नांवाचा दौलतरावच नव्हे हा ! " ते मिशांना पीळ भरीत म्हणाले.

" इश्य ! हें काय एवढं संतापायचं तें ! गेली नोकरी तर गेली. दुसऱ्यांना दोष देण्यांत काय अर्थ ? कवीनं म्हटलं आहे कीं, 'होणारें न चुकेल होइल जरी ब्रह्मा तया आडवा !' नका मनःस्ताप करूं. शांत रहा. ईश्वरदयेनें आपणांला सर्व कांहीं अनुकूल आहे. सारं घर कसं भरलेलं आहे. " ती त्यांना हिंमत यावी म्हणून म्हणाली.

" खरंच सुनू, तूं म्हणतेस तें अगदीं अक्षरशः खरं आहे. तुझ्यासारखी हिंमत देणारी चतुर सुगृहिणी पदरीं पडायला पूर्वजन्मींचं सुकृतच हवं

आहे. त्या दृष्टीनं मी फार भाग्यवान आहें; म्हणूनच तुझ्यासारखं रत्न माझ्या पदरीं पडलं आहे. " ते म्हणाले.

मग अमळशानं ते कोटटोपी घालून जरा बाहेर फिरून यावं म्हणून जायला निघाले. ' लौकर परत या ' म्हणून सूचना करायला सुनंदा विसरली नाहीं.

ते बाहेर निघायला व तिकडून सोनाजी जॉबर त्यांच्या दिशेनें यायला एकच गांठ पडली. नमस्कार–चमत्कार झाल्यावर सोनाजीनं त्यांना अड्ड्यावर चलण्याची विनंति केली. दौलतरावांनीं थोडेसे आढेवेढे घेतले; पण त्यांच्या अंतर्मनाला पुन्हा एक प्रकारची दारुडी ओढ गोड अशी संवेदना करूं लागली. ते क्षणमात्र थांबले. जरासा कपाळाला ताण देऊन त्यांनी विचार केला, ' सुनंदा काय म्हणेल ? खरंच, किती निष्पाप व निरागस आहे ती ! तिच्या गळ्याची शपथ आपण घेतली तेव्हां किती किती आनंद ओसंडून निघाला तिच्या तोंडावर ! नोकरी गेली तरी आपल्याला हिडिस फिडिस न करता, किती हळुवार रीतीनं तिनं आपल्याला उत्तेजन दिलं आणि असल्या सुगृहिणीच्या उपदेशाला लाथाडायचं ! परत दारू घ्यायची ! या हलक्या लोकांच्या गॅंगमध्यें दाखल व्हायचं ? छे ! नकोच ते दुष्ट विचार. '

" नाहीं ! सोनाजी, मला तुझ्याबरोबर नाहीं येता यायचं ! जा तूं परत माझ्यासमोरून ! " ते तिरस्कार दर्शवीत म्हणाले व लगेच पाठमोरे होऊन चालूं लागले.

सोनाजी दृष्टीसमोरून निघून गेल्यावर त्यांनां पुन्हा एकदां आपल्या मिश्यांना मोठ्या अभिमानानं पीळ भरला. आत्मविश्वासाचं तेज त्यांच्या चर्येवर पुरेपूर उमटून दिसलं. ते मनाशीं म्हणाले,

' कशी छान सुनावलीय्. नाहींच मी आतां दारूला शिवायचा ! बस्स् निश्चय ठरला तो ठरला. आतां सुनंदेला खूप खूप सुखी करायचं. छोट्या अशोकचे भरपूर लाड करायचे; भरपूर वाचन करायचं आणि आपलें घर भलें कीं आपण भलें असें वागायचें आतां ! '

अशा आत्मविश्वासाच्या विचारांत ते जरा आनंदी मनानंच लौकर

घरीं परतले. येतांना रस्त्यावरल्या फुलांच्या दुकानांतून सुनदेकरितां एक ताज्या मोगरीच्या फुलांची मस्त सुगंधानं बहरलेली अशी वेणी त्यांनीं विकत घेतली; व घरांत हलकेच प्रवेश करून सुनंदेच्या भुंग्यासारख्या काळ्या कुळकुळीत केशसंभारांत ती स्वहस्तें खोवून दिली.

———

## प्रकरण ४ थें



दुसरे दिवशीं सकाळीं नेहमींप्रमाणें दौलतराव निजून उठले. आतां त्यांना कॉलेजला ड्युटीवर जावयाचें नव्हतें व म्हणून त्यांना कोणत्याही कामाची मुळींसुद्धां घाई नव्हती. आज उठल्यावर जराशी प्रसन्नताहि वाटली त्यांना. नंतर त्यांनीं हंसतखेळत सुनंदेबरोबर चहा घेतला व मग मंडईतून भाजी आणण्याकरितां म्हणून ते पिशवी हातांत घेऊन बाहेर पडले.

आणि सहजासहजीं न घडून येणारा योग आज या वेळीं अकस्मात रीत्या घडून आला. मंडईत दौलतरावांनीं एका बाजूनं प्रवेश करायला व तिकडून प्रो. रंगरावांनीं मंडईत यायला एकच गांठ पडली. नमस्कार-चमत्कार झाल्यावर रंगरावांनीं दौलतरावांची नोकरी गेल्याबद्दल फार हळहळ व्यक्त केली. कुशल प्रश्न झाल्यावर रंगरावांनीं मोठ्या आग्रहानं दौलतरावांना आपल्या घरीं नेलं. दौलतरावांच्या दुःखी मनाला त्यांनीं सहानुभूतीनं खूप खूप धीर दिला.

" खरंच दौलतराव, या दारूच्या पायीं तुमची एवढी अधोगति होईल याची मला मुळींसुद्धां कल्पना नव्हती. सुशिक्षितांनीं दारू पिणं आणि

अगदीं आशिक्षित अशा अडाण्यांनीं दारू पिणं यांत जमीनअस्मानाएवढें महदंतर आहे. समाजांत प्रतिष्ठा लाभलेल्या वर्गातील आपण माणसं जर दारूच्या आधीन होऊन असं रस्त्यानं लोळत राहिलों, तर इतर कंगाल परिस्थितीच्या दारुड्यांत व आपल्यांत फरक तो काय राहिला ? मला तर तुमच्याबद्दल राहून राहून हें आश्चर्य वाटतें कीं, तुम्ही एवढ्या अल्पावधींत अगदीं खालच्या वर्गाच्या लोकांत जाऊन दारूबाज बनलांत कसे ? तुमची चिकित्सक बुद्धि व अभ्यासू वृत्ति आणि सुसंस्कृत मन ह्या साऱ्याच गोष्टी एकदम एवढ्या लौकर कशा नामशेष झाल्या ? " रंगराव त्यांच्याकडे तुच्छतेनें पहात म्हणाले.

" हें पहा रंगराव, व्हायला नको तें हातून घडलं गेलं याला माझा आतां इलाज नाहीं. माझ्या अधोगतीबद्दल तुम्हांला तरी कसा दोष देऊं ? माझ्या कमकुवत मनाकडेच तो दोष येतो. "

" मला दोष ! आणि तो कोणत्या रीतीनं बुवा ? "

" होय रंगराव ! मी दारुड्या बनलों. नोकरीला मुकलों. जीवनांतील माझी एकतानता– तो आनंदाचा ठेवा नाहींसा झाला याचा सारा दोष तुझ्याकडं कांहीं अंशीं तरी येतोच ! राग नको येऊं देऊस; पण ज्या वेळीं तूं मला तुझ्या घरीं पहिला दारूचा प्याला भरून दिलास त्यावेळच्या तुझ्या शब्दांची आठवण कर. "

" होय ! आहे मला ती आठवण. पण तेवढ्याशा प्रकारानंतर तूं असा अट्टल घेणारा बनशील याची मला जरा सुद्धां कल्पना नव्हती. आपण लंगोटीमित्र असून तुझ्या स्वभावांतील अभ्यासूवृत्ति व विचारांचें गांभीर्य हीं माझ्या चांगल्या परिचयाचीं आहेत. शिवाय ' दारूची जरूरी माणसाला कां आहे ?' आणि ' माणूस दारू कां पितो ? ' या विषयांवर आपली अनेक वेळां चर्चाहि झालेली आहे. नीट आठवण कर मित्रा ! याच ठिकाणीं आपली सारी मित्रमंडळी एकत्र जमली असतांना सरकारच्या दारूबंदीच्या धोरणावर आपली चर्चा चालली होती; तेव्हांची आपली विषय प्रतिपादन करण्याची भूमिका आपण लक्षांत घ्या. केवळ कोपऱ्यांत उंची मद्याचा एखादा ग्लास बड्या पाहुण्यांच्या किंवा निकटच्या मित्रांच्या

आग्रहाखातर घेतला म्हणजे तेवढ्यानें आपण मिलमजुरांच्या चाळींत दारू-ड्यांच्या अड्डयांत जाऊन दाखल व्हाल, असें अनुमान मलाच काय पण दुसऱ्या कोणालाहि करतां येणार नाहीं. इतकें दुबळें मन एका सुसंस्कृत प्रोफेसराचें निघावें याचेंच मला राहून राहून नवल वाटतें आहे ! ”

इतक्यांत नोकरानें चहाफराळाचं साहित्य तिथं आणलं व कांहीं क्षण तें बोलणं तसंच थांबलं.

“ खरं आहे रंगराव तुझं म्हणणं ! मीच माझ्या अधःपाताला सर्वस्वीं जबाबदार आहें. पण राहून राहून आश्चर्य वाटतें तें हेंच कीं, तुझ्यासार-ख्यानं सुद्धां मला अव्हेरावं, धिक्कारावं ! जिकडे तिकडे अपमान ! कुठेंहि मनाला शांतता नाहीं. मनस्ताप ! छे ! नकोच हें जीवन आतां. ” दौलतराव वैतागानं म्हणून गेले. त्यांनीं दोन्ही हातानीं आपलं कपाळ दाबून धरलं.

“ शांत हो ! मित्रा, शांत हो !! ” रंगराव म्हणाले.

“ शांत हो ! नाहीं ! रंगराव, आतां मनाला शांतता मिळणं कदापि शक्य नाहीं. नोकरी गेली. सारे मित्र दूर पळाले. तूं देखिल उपदेशाचे डोस पाजून माझ्या दुखावलेल्या मनाला घायाळ करूं पहातोस. खरोखर या जिवाचाहि मला आतां कंटाळा आलाय्. ”

“ हें काय दौलतराव ? तुला धीराचे दोन शब्द सांगण्याकरतां, चुक-लेल्या मार्गावरून परत फीर असा मित्रत्वाचा सल्ला देण्याकरतां मी इथं आग्रहानं घेऊन आलों, तो माझा हेतु कुठंच राहिला व लागलास आपला कांहींतरी बडबडायला. शोभत नाहीं तुला हें दौलतराव. चल आटप ! घे तो चहा, निऊन चाललाय बघ ! ” रंगराव समोरच्या कपाटाकडं अंगुलि-निर्देश करून म्हणाले.

“ आतां हा चहा नकोय मित्रा ! या मनस्तापावर तो थंड चहाच हवाय. ”

“ पण दौलतराव, इथं पिऊन तूं परत घरीं गेलास म्हणजे सुनंदा वहिनींना माझाच जास्त संशय यावयाचा. शिवाय तुझा आरोपहि माझ्यावर लाद-लेला आहेच कीं, ‘ मीच तुला दारूचं व्यसन लावलं म्हणून. ’ तेव्हां आतां

यापुढं इथं तूं दारू न प्यालेलंच बरं. तुला मुद्दाम आग्रहानं घरीं आणलं याचं कारण, मित्र या नात्यानं तुला दोन समजुतीच्या गोष्टी सांगाव्यात हेंच होतं. पण तुझ्या एकंदर बेफाम बोलण्यावरून माझ्या सांगण्याचा तुझ्यावर कांहीं परिणाम होईल असें मला वाटत नाहीं. बरं, आतां मला दुसरीं कामं पार पाडावयाचीं आहेत. तेव्हां आपण गेलेलंच बरं. " रंगराव खुर्चीवरून उठत म्हणाले.

दौलतराव शरमिंदे होऊन तिथून उठले व रस्त्याला लागले. रंगरावांचें बोलणें त्यांच्या मानी मनाला चांगलेंच झोंबले. आपल्यापेक्षां वयानं, अनुभवानं, व्यासंगानं कमी असणाऱ्या मित्रानं आपल्याला सुधारण्याचा साळसूद उपदेश करावा, आपल्याला धिकारावं, आपली अवहेलना करावी या साऱ्या प्रकारांची त्यांना फार चीड आली. आतां परत या रंगरावाचें तोंड पहाणें नको, असें त्यांनीं मनाशीं ठरविलें व ते तडक सोनाजी जॉबरच्या घराच्या दिशेनं झपझप पाय उचलून चालूं लागले.

सोनाजी जॉबर या वेळीं घरींच होता. त्यानं प्रकृति चांगली नाहीं या सबबीवर मिलमधून आठ दिवसांची रजा काढली होती. दौलतरावांना आपल्याकडे असें अचानक रीत्या आलेले पाहून त्याला मनाशीं आश्चर्य आणि आनंदही वाटला. पण तो उघड व्यक्त न करतां त्यानं कण्हत कुंथत त्यांच्याशीं बोलायला सुरवात केली.

" काय सोनाजी, आज घरींच ? मला वाटलं मिलमध्यें गेला असशील. सहज या रस्त्यानं जावं म्हणून चाललों होतों. तुझं घर पाहून सहज म्हणून हांक मारली ! प्रकृति ठीक नाहीं का ? काय होतंय् ? " त्यांनीं जवळच्या हात मोडलेल्या खुर्चीवर आंग चोरून बसत विचारलं.

" होय प्रोफेसरसाहेब ! गेल्या दोन दिवसापासून माझी प्रकृति मुळींच चांगली नाहीं. सारखं पोटात दुखून येतंय ! हरे राम......अंऽऽअग आऽऽऽई..." सोनाजी सतरंजीवर कुशीवरून वळत म्हणाला.

" मित्रा, घाबरूं नकोस, मी चोळून देतोंय ! जरा शांत पड म्हणजे बरं वाटेल. " त्याच्या पोटावरून हात फिरवीत ते म्हणाले.

" नका नका प्रोफेसरसाहेब, तुम्ही एवढी तसदी नका घेऊं; होईल तें

अंमळशानं बरं !"

"तसदी ? यांत कसली आली आहे तसदी. मित्राच्या दुःखद प्रसंगीं त्याच्या उपयोगी पडणं हें प्रत्येकाचं कर्तव्यच आहे, नाहीं का ?"

"होय! पण आपली व माझी लायकी किती भिन्न प्रकारची आहे—" सोनाजी उठून बसत म्हणाला.

"छे ! छे ! असं नको समजूस तूं सोनाजी ! तुला मी कोणत्याही दृष्टीनं कमी लेखत नाहीं. उलट माझ्या एका नकली प्रोफेसर मित्रापेक्षां तुला माझा अधिक हितकर्ता समजतों."

"नकली प्रोफेसर मित्र ? हा कोण बुवा ?"

"अरे तो XXX कॉलेजांतला प्रोफेसर, रंगराव नाहीं का ? तोच !"

"रंगराव... ? रंग्या चिकटे म्हणून म्हणतात तो तर नव्हे ?"

"होय, तोच तो ! मला शहाणपणाच्या गोष्टी सांगत होता. दारू पिऊं नको, हलक्या लोकांत बसूं नको, पोझिशन औट होतंय, असं म्हणत होता लेकाचा !"

"कोणाचं पोझिशन औट होतंय साहेब, त्याचं का आपलं ? काय तरी लेकाचा शेखी मिरवतोय. दारू पिऊन पिऊन तर हाडकं रंगलींय बेट्याचीं ! कैकदां मी गुत्त्यावरून उचलून घरीं पोहोचवलाय तें सारं विसरलास का म्हणावं ?"

"अंऽ करूं दे रे त्याला वटवट. त्याच्या बोलण्याला मी कुठं भीक घालतोंय ! हं, चल ऊठ, एक आण !" खिश्यांतून दहा दहाच्या तीन नोटा काढून त्याच्या हातीं देत दौलतराव म्हणाले.

आणि मग तिथं ते दोन्ही पिऊन तर्रर झाले. दौलतरावांनीं त्या धुंदींत रंगरावांच्या सात पिढ्यांचा उद्धार केला. आपल्याविरुद्ध युनिव्हर्सिटीच्या बोर्डाकडं रिपोर्ट करणाऱ्या भाव्यांचाहि त्यांनीं शेकडों शब्दांनीं उद्धार केला. दोन्ही खूप खूप प्याले. प्रोफेसर बेभान झाले. वाटेल तसें अपवित्र बोलूं लागले. सोनाजीनं त्यांना सतरंजीवर निजवून दिलं व मग ते झोपेच्या आधीन झाले.

सायंकाळच्या सुमारास त्यांना सोनाजी पोहोचवायला निघाला. पण ते

घरीं जायला तयार होईनात. रस्त्यांत त्यांनीं पुन्हा हॉटेलांत जाऊन थोडीशी घेतली. सारं बिल त्यांनींच चुकतं केलं. एकूण पाऊणशें रुपयांचा खर्च आज त्यांचा झाला होता. जास्त झिंगूं लागल्यावर ते दोन्ही तेथून उठले. उठले म्हणण्यापेक्षां त्यांना हॉटेलच्या मालकान हात धरून बाहेर हाकललं असं म्हणणंच जास्त सयुक्तिक होईल. रस्त्यावरून त्यांना धड चालतांहि येत नव्हतं.

आतां या वेळीं रात्रीचे दहा वाजून गेले होते. रस्त्यावरची रहदारी अद्याप कमी झाली नव्हती. ट्राम, बसेस व तांगे यांची येजा जोरांत सुरूच होती. दौलतरावांना आतां दारूचा अंमल जास्तच चढला होता. दुपार-पासून या वेळेपावेतों ते एकसारखे पीतच होते. शिवाय पोटांत अन्नाचा एक कणहि गेलेला नव्हता. अति मनस्तापानं त्यांनीं आज अधाशा-सारखं पिणं चालविलं होतं. घरची त्यांना ओढ नव्हती. रंगरावांच्या बोलण्यानं व पूर्वीच्या त्यांच्या विरुद्ध घडत गेलेल्या साऱ्या घटनांनीं त्यांचा मनस्ताप पराकोटीला गेलेला होता; व त्याचा उपशम व्हावा या हेतूनं त्यांनीं आज मनसोक्त दारूचं पान केलं होतं.

सोनाजी कांहींसा शुद्धींत होता. त्यालाहि आतां दौलतरावांना आटो-पून धरणं मुष्किलीचं झालं होतं. रस्त्यावरच्या पोलिसांचा डोळा चुकवून तो मोठ्या चातुर्यानं व आस्ते आस्ते त्यांचा हात धरून फुटपाथवरून चालला होता. इतक्यांत तिकडून एक युरोपियन तरुणी घाईघाईनं येत असलेली दौलतरावांना दिसली. त्यांचें देहभान ठिकाणावर नव्हतेंच. त्यांनीं तिला डिअर, डिअर म्हणून हाका मारण्याचा सपाटा चालविला. आतां लक्षण ठीक नाहीं या विचारानं सोनाजीनं त्यांचा धरून ठेवलेला हात सोडून दिला व तो विद्युत्वेगानं तिथून पसार झाला.

युरोपियन तरुणीच्या नोंदलेल्या तक्रारीवरून जवळच्या पोलीस अंमल-दारानं दौलतरावांना तशा झिंगलेल्या स्थितींत अटक करून पोलीस ठाण्यावर नेलं आणि तेथें लॉकअपमध्यें ठेऊन दिलं. साऱ्या रात्रभर ते अद्वातद्वा बोलत होते. त्यांना चूप करण्याचे ठाण्यांवरील पोलिसांनीं नाना प्रकारचे इलाज केले. पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं. शेवटीं

दंडुक्याचा प्रसाद मिळाल्यावर ते विव्हळत आंत भिंतीजवळ कोलमडून पडले; व पहाटेच्या सुमारास त्यांचा जरा डोळा लागला.

दुसरे दिवशीं दौलतरावांना अनेक प्रकारच्या विनवण्या केल्यानंतर पोलिसाकडून घरीं जाण्याची परवानगी मिळाली. त्यांचा चेहरा शरमेनं काळाठिक्कर पडला. त्यांना आतां हें काळें तोंड सुनंदेला दाखविण्याची शरम वाटूं लागली. दारूच्या पायीं आपली नोकरी गेली व पुढें आणखी काय काय दुःखें नशिबांत लिहिलीं आहेत याचा त्यांना बोध होईना. त्यांना असेंहीं वाटूं लागलें, आतां घरी न जातां इकडेच जिवाचं कांहींतरी बर वाईट करून घ्यावं. पण तेवढेंही मनोधैर्य त्यांच्या लाचार मनाला करतां येणें शक्य नव्हतं.

पोलिस चौकींतून बाहेर पडल्यावर ते अशा प्रकारच्या विचारांच्या झंझावातांत घराजवळ येऊन दाखल झाले.

आतां सुनंदा काय म्हणेल ? आपला दोन दिवसांपासून पत्ता नाहीं. त्यामुळं ती काळजी करून करून शुष्क झाली असेल. तिचं कोमल अंतःकरण आपणांविषयीं विचार करून करून होरपळून निघालं असेल. खरंच किती निष्पाप व निरागस ती ! आपण मात्र फार अधमपणानं तिच्याशीं वागतों आहोंत...

ते अशा विचारांच्या संभ्रमावस्थेंत शरामिंद्या मनानं घरांत येऊन दाखल झाले;पण आंतमध्यें त्यांनीं पाय टाकतांच त्यांना काय दृश्य दिसलं ? डॉक्टर रमानाथ कानांत स्टेथास्कोपच्या नळ्या असलेल्या स्थितींत सुनंदेशीं बोलत उभे होते. सुनंदेचा चेहरा काळजीनं अगदीं म्लान झाला होता. डॉक्टरहि तशाच चिंतातुर मनानं उभे होते. बाळ अशोक तापानं फणफणला होता आणि डॉक्टर सुनंदेला दोन धीराचे शब्द सांगत होते.

तो प्रकार पाहून दौलतराव मनांत काय तें समजून चुकले. पांढऱ्या शुभ्र बिछान्यावर अशोक पडला होता. त्याच्या कपाळावर नुकतीच कोलन वॉटरची भिजविलेली घडी ठेवलेली दिसत होती. जवळच्या स्टुलावर पड-लेल्या औषधांच्या छोट्या बाटल्या, कॉटन् पीसेस, हॉट वॉटर बॅग ह्या साऱ्यावरून त्यांची नजर अधाशासारखी फिरून गेली.

" बरंय् ! सांगितलं त्याप्रमाणें काळजी घ्या ! तासातासानं पुड्या द्या म्हणजे ताप उतरेल. घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं. केस माझ्या आटो-क्यांतली आहे. पुन्हा चार वाजतां चौकशीला येईनच ! " डॉक्टर रमानाथ सुनंदेला म्हणाले व एक ओझरता दृष्टिक्षेप दौलतरावांवर टाकून ते बुटांचा खाड् खाड् आवाज करीत चालूं लागले.

" थांब ! मित्रा, थांब ! जाऊं नकोस ! थांब इथंच ! तुझे पाय धरून मी माझ्या अश्रूंचें सिंचन त्यांवर करतों. थांब बालमित्रा, थांब. हातांत बूट घे व त्यानें हें काळें झालेलें माझें थोबाड फडाफड फोडून काढ ! " दौलतराव डॉक्टरना हातानं थांबवून म्हणाले.

" दौलतराव, आतां इथं थांबण्यांत मला स्वारस्य दिसत नाहीं. आपला स्वतःचा एकुलता एक मुलगा घरीं तापानं बेजार झाला असतांना जो पिता...छे ! पिता कसचा ? काय नांव द्यावे त्याला ? ...साऱ्या रात्रभर दारू पिऊन घराबाहेर राहातो त्याला काय नांव द्यावं हे मला समजत नाहीं. सुनंदेसारखी सालस व गरीब स्वभावाची मुलगी पत्नी म्हणून पदरीं पडली असतांना, अशा सोन्यासारख्या पत्नीला विसरून व तिचा सल्ला झिडकारून आणि अशा भरल्या सुखाला लाथ मारून साऱ्या रात्रभर उनाड लोकांत दारू पितांना कांहीं शरम वाटायला पाहिजे तुला. अशा उलट्या काळजाच्या इसमाचें तोंड मी पाहूं शकत नाहीं. खरंच, केवळ सुनंदा वहिनीच्या निष्पाप व निरागस चेहेऱ्याकडं पाहून मी इथं बाळाला उपचार करणेस आलों. नाहींपेक्षां..."

" नका नका डॉक्टरसाहेब, त्यांना असें टाकून बोलूं नका, मनस्ताप होईल त्यांना. रात्रीचं पोटांत कांहीं गेलं नसेल. " सुनंदा मध्येंच म्हणाली.

" पुरें करा तुमची दयार्द्रवृत्ति वहिनी ! अशा बेपर्वा मनुष्याची चांगली कानउघाडणी करण्याऐवजीं त्यांना अशा क्षमाशील वागणुकीनं एक प्रकारचं उत्तेजनच देतां आहांत तुम्ही. " डॉक्टर सुनंदेकडं पहात म्हणाले.

"मित्रा, बैस जरा. मला तुझ्याशीं बरंच बोलायचं आहे ! पण त्याआधीं अशोकच्या गोजिरवाण्या मुखाकडं मला एकदां डोळे भरून पाहिलं पाहिजे. तेव्हां चल प्रथम बाळाजवळ. " असें म्हणत दौलतराव अशोक झोंपला

होता तिथं आले.

" नको दौलतराव, त्याला हात नको लावूंस ! त्याला नुकतेंच औषध दिलें आहे. तो मध्येंच उठतां उपयोगी नाहीं. घाम आलाय् त्याला. चल तिकडंच ! बैठकींत बसूं या हवं तर ! " डॉक्टरनीं म्हटलं.

" पण डॉक्टर, बाळाच्या प्रकृतिबद्दल जास्त काळजीसारखें तर नाहीं ना ? "

" छे ! दोषी ताप आहे तो ! आत्तांच्या औषधानं त्याला खात्रीनं बरं वाटेल. चल इथून. नाहींतर तो उगाच उठावयाचा व रडून बेजार व्हावयाचा. " डॉक्टर दौलतरावांना बैठकीकडं नेत म्हणाले.

" बैस मित्रा ! आज सारं अंतःकरण तुझ्यापुढं उघड करायचंय् मला. बैस इथं ! " दौलतराव खुर्चीकडे अंगुलीनिर्देश करीत म्हणाले.

आसनस्थ झाल्यावर सुनंदा चहा करण्याकरितां आंतमध्यें निघून गेली व दौलतरावांनीं आपला पश्चात्ताप व्यक्त करायला सुरवात केली.

" खरंच सांगतों डॉक्टसाहेब, मला अगदीं मनापासून वाटतें कीं, दारू सोडून द्यावी, तिचें नांवही काढूं नये. पण काय करूं ? माझ्याकडून नाहींच सुटत ती ! " दौलतराव म्हणाले.

" दौलती, तुझें हें बोलणें मला मनापासूनचें वाटत नाहीं. तुझ्यासारख्या सुसंस्कृत मनाच्या इसमानें असे लाचारीचे उद्गार काढावेत याचेंच मला आश्चर्य वाटतें. मी सांगतों त्याप्रमाणें वागशील तर तुझी दारूची संवय तात्काळ सुटेल. " डॉ. रमानाथ म्हणाले.

" होय ! कबूल आहे मी तूं सांगशील त्याप्रमाणें वागायला ! "

" मग उद्यांपासून मजकडे नियामितपणें दिवसांतून दोन वेळां येत जा ! सरकारनें दारूऐवजीं नीरा केंद्र सुरू केलें आहे. केंद्रावर जाऊन नीरा प्यालास म्हणजे दारूची नाहीं आठवण यायची तुला. शिवाय कॉंग्रेस सरकारनें दारू पिणाऱ्यांची संवय सुटण्याकरतां आरोग्यदायक करमणुकीचीं व श्रमपरिहाराचीं साधनें उपलब्ध केलीं आहेत. अशीं करमणूक केंद्रें जागोजाग काढण्याची योजना सरकारनें जारीनें सुरु केली आहे. आमच्या भागांत असलें एक करमणूक केंद्र नुकतेंच सरकारनें उघडलें आहे. त्यांत

गेल्यानें तुझें व्यसन खात्रीनं सुटेल अशी मला आशा वाटते. त्या केंद्रांत बैठे खेळ, मैदानी खेळ, कुस्त्या, भजनें, नाटकें हे सर्व प्रकार सुरू केले आहेत. तिथलं वातावरणच असं असतं कीं, दारुड्याला जरा सुद्धां दारुची आठवण येऊं नये आणि करमणूक केंद्राच्या जवळच नीरा केंद्र उघडलें असलेनें एखाद्या ओढाळ मनाला दारुची आठवण झालीच तर नीरा पिऊन ती आठवणहि येत नाहीं. तिथं जाऊन कांहीं इसमांची संवय सुटली असल्याचा मला प्रत्यय आलेला आहे. तिथं तूं सारा दिवस घालवावा अशी माझी इच्छा आहे." डॉ. रमानाथ चिरूट पेटवीत म्हणाले.

"फारच छान सल्ला आहे डॉक्टर ! सरकारनें अशा प्रकारचीं करमणूक केंद्रें सुरू केलीं हें फार चांगलं केलं. नीरा केंद्रावर आजादिनपावेतों मी कधीं गेलों नाहीं."

"हें पहा दौलतराव, नीराकेंद्र सुरू करणें, दारुड्यांची दारूची सवय सुटावी म्हणून निरनिराळीं करमणुकीचीं साधनें त्यांना उपलब्ध करून देणें, या झाल्या सरकारनें करावयाच्या गोष्टी; पण दारू खरोखर मनापासून सोडावयाचीच असेल तर त्याला स्वतःच्या मनाचीहि तशीच खंबीर तयारी पाहिजे. या महिन्यांत मी माझ्या कांहीं पेशंटस्‌ची दारू या केंद्रावर घेऊन जाऊन सोडविली आहे. नीरा ही अगदीं ताजी व पौष्टिक असते. शरिराला हितावह असें तें पेय असून त्यांत अंमल येणेचा जरासुद्धां गुणधर्म नाहीं आणि नीरा प्राशन करणाराला खरोखरच दारूची आठवणहि येत नाहीं. नीरा पिऊन झाल्यावर सरळ करमणूक केंद्रावर जावं आणि तेथल्या नानाविध कार्यक्रमांनीं आपलं मन रिझवावं. पहा कशी दारू सुटत नाहीं ती ! मी खात्रीनं सांगतों कीं ती तात्काळ सुटलीच पाहिजे !" डॉक्टर आवेशानं म्हणाले.

"खरंच फार आभारी आहें तुझा मी डॉक्टर ! निदान या वेळीं तरी मला तूं परमेश्वरच भेटलास ! माझ्या भांबावलेल्या मनाला तूं दिलासा दिलास याबद्दल मी तुझा फार फार आभारी आहें !" दौलतराव म्हणाले.

"छे ! छे दौलतराव ! इतक्यांत आभार मानून मोकळे होण्याइतका

हा विषय साधा, सरळ व सोपा नाहीं. पहिल्या प्रथम तूं इथं आलास तेव्हां तुला पाहून माझ्या मनांत फार क्रोध उत्पन्न झाला. सुनंदा वहिनी म्हणाल्या, 'त्यांचा परवांपासून पत्ता नाहीं' आणि अशोक तर तापानें नुसता भाजून निघाला होता. तेव्हां साहजिकच मला तुझा राग आला व मी तो उघड व्यक्तहि केला. पण त्याबद्दल वास्तविक मीच तुझी क्षमा मागावयास पाहिजे. इतक्या सरळ मनाच्या मनुष्याचा केवळ दारूनं असा अधःपात व्हावा याचं मला राहून राहून नवल वाटत आहे."

"तुम्ही म्हणतां तें सारं खरं आहे डॉक्टर! आतां आपण कांहींहि करून माझी ही संवय सोडवावी व अधोगतीच्या मार्गावर जात असलेल्या या मित्राला धीराचा हात देऊन योग्य मार्गावर आणावं हीच माझी विनंति आहे." दौलतराव लाचार नजरेनं त्यांच्याकडे पहात म्हणाले.

"मग मी सुचविल्याप्रमाणं उद्यांपासून मजकडे ये! तुझ्यासारख्याच कांहीं व्यक्ती मजकडे दारूची संवय सुटावी म्हणून येत असतात. त्यांना मी करमणूक केंद्रावर पाठवीत असतों."

इतक्यांत सुनंदा तिथं चहाचा ट्रे घेऊन आली व मग त्यांचें तें भाषण तेवढ्यावरचं थांबलें. चहाचा ट्रे टेबलावर ठेऊन ती बाजूला उभी राहिली. दौलतरावांनीं ट्रेमधून एक कपबशी उचलून ती डॉक्टर रमानाथांना दिली व दुसरी आपण घेतली. चहापान चालूं असतांना डॉक्टर आळीपाळीनं दोघांकडे पहात होते. दौलतराव एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें आपली लाचार नजर मधूनच सुनंदेकडे लावत होते. त्यांना वाटत होतें सुनंदा आपल्यावर रागावली असेल, कोपली असेल...

"हें पहा वहिनी, आतां या वेळेपासून दौलतरावांनीं दारू कायमची सोडली असं निश्चित समजा!" डॉक्टर सुनंदाकडं पहात म्हणाले.

"तें कसं काय भाऊजी? असा यक्षिणीची कांडी फिरवल्यागत काय चमत्कार झाला तो तरी कळूं द्या!" तिनं भिंतीला टेकल्या स्थितींतच विचारलं.

"तें कळेल सावकाश. पण मी म्हणतों कीं, आतां या क्षणापासून यांची दारू कायमची सुटली असं खात्रीनं समजा!" डॉक्टर खुर्चीवरून

उठत म्हणाले.

" तुमची वाणी सत्य होवो डॉक्टर ! तुमचें तोंड साखरेनं भरून काढीन. बाई जगदंबे ! खरं कर हें बोलणं ! इकडची दारू सुटूं दे व बाळाला दीर्घायुष्य दे ! " असं म्हणत कपबशा उचलण्याकरतां ती टेबलाजवळ आली. डॉक्टर निघून गेले होते.

" खरंच सुनू चुकलों मी ! मला क्षमा कर ! आतां या क्षणापासून दारूच्या एका थेंबालाहि शिवणार नाहीं मी ! आतां बाळाला घेणें व त्याचें कोडकौतुक करणें. बस्स, ठरला निश्चय. " प्रो. म्हणाले.

" पण मला नाहीं वाटत तें खरं ! मागंहि असाच निश्चय केला होता... "

" तें मागचं मागं गेलं. झालं गेलं तें कृष्णार्पण समज. आतां बोललों यांत जराहि बदल नाहीं व्हायचा. डॉ. रमानाथांनीं सांगितलेल्या मार्गानं मी माझी दारू सोडणार आहे. हा झालेला निश्चय मी कधींहि बदलणार नाहीं. "

---

## प्रकरण ५ वें

खरोखर ' मन ' ही एक मोठी ओढाळ चीज परमेश्वरानं मानव प्राण्याला देणगीदाखल दिली आहे. संयमाच्या कड्यावर उभे राहून माणूस तोल सावरण्याची पराकाष्ठा करतो तोंच हें ' मन ' त्याला अधोगतीच्या खोल गर्तेत नेऊन सोडण्यास उद्युक्त करतें. याची घडण कशी चमत्कारिक याचें आकलन मानव प्राण्याला आजादिनपावेतों झालेलें नाहीं. त्याला जिंकून ताब्यांत ठेवणें कोणालाहि शक्य झालें नाहीं. मनुष्य सुज्ञ असो, शास्त्रज्ञ असो, योगी असो किंवा प्रखर तपस्वी असो, या मनानं आपलें मोहअस्त्र क्षणमात्र चालवून त्याला कर्तव्यच्युत केलें नाहीं, असें व्हायचेंच

नाहीं. मग त्यापुढें सामान्य गृहस्थाश्रमी माणसांची काय गत ?

पूर्वीच्या काळीं मनाला मोह पाडणारीं साधनं हल्लीइतकीं सहजगत्या उपलब्ध अशीं नव्हतीं. तरी मोठमोठ्या योद्ध्यांना, राज्यकर्त्यांना, कलाकारांना ही मोहमाया ‘ दारू ’ पदोपदीं सांथ करीतच असे. मोठमोठे मोंगल सम्राट, रजपूत योद्धे, वैभवशाली बाजीराव पेशवा कोणीहि हिच्या कचाट्यांतून सुटलें नाहीं. इंग्रजांचें राज्य आपल्या देशावर कायम झालें त्या वेळीं या दारूला समाजांत सभ्यतेचा बुरखा मिळाला. पाश्चात्य राष्ट्रांत तर दारू पिणें हें एक शिष्टसंमत आदरसत्काराचें प्रतीक समजलें जातें. विशेषतः अमेरिकेंत हिचे जास्तच चोचले पुरविले जातात. कोणतीहि पार्टी किंवा उद्यानोपहार दारूच्या शिवाय तिथं पारच पडूं शकत नाहीं. कांहीं अमेरिकन तरुणीसुद्धां नित्याच्या भोजनापूर्वी मद्याचा डोस घेतल्याशिवाय रहात नाहींत. इतकें हें व्यसन तिथें ठाण मांडून राहिलं आहे. याचा परिणाम सहाजिकच त्या लोकांचा शारीरिक व मानसिक ऱ्हास पुरेपूर होण्यांत झाला आहे व आतां तेथेंहि दारूबंदी करण्याचे प्रयत्न चालू झालेले आहेत. पाश्चात्य लोकांच्या राहाणिशीं आपल्या राहाणीची तुलना कोणत्याहि बाबतींत केव्हांहि होऊं शकत नाहीं. तिकडचें हवामान व इकडचें हवामान हीं फार भिन्न भिन्न आहेत. शिवाय तेथल्या माणसांची उत्पन्नाची सरासरी ही केव्हांहि इकडच्या माणसाच्या उत्पन्नापेक्षां बरीच जास्त आहे. शिवाय दुसरींहि पुष्कळ कारणें प्रामुख्यानें सांगतां येतील.

ब्रिटिश राज्याची पकड हिंदुस्थानवर दृढ झाल्यावर गेल्या शें-दीडशें वर्षांत इथं दारूचीं दुकानें सर्व भागांत भरमसाट वाढविलीं गेलीं. पाश्चात्य शिक्षणानं आपली बुद्धी घासून पुसून चकचकीत झाली या भ्रमांत असलेल्या सुशिक्षितांना दारूचें सेवन हा एक नैतिक गुन्हा आहे याचें भान राहिलें नाहीं. शहरापासून तों लहानलहान खेड्यांपावेतों दारूगुत्त्यांची संख्या सालोसाल वाढविली गेली. उत्पन्नाच्या फुगीर आकड्याकडे पहाणारं परकं सरकार लोकांच्या ढासळणाऱ्या आरोग्याचा व नैतिक अधःपाताचा विचार करणं शक्यच नव्हतं. त्यांनीं उलट जोडीला विलायती दारूची भरमसाट आयात इथं करविली व त्यापायीं क्रोडों रुपयांची लूट येथून

आपल्या देशांत राजरोस करून नेली.

हें व्यसन इथं बोकाळण्याला परकें सरकार व जनता हीं दोन्हीं सारखींच जबाबदार आहेत. आतां सुदैवानं तें परकें सरकार इथून कायमचें गेलें आहे आणि आपल्या कॉंग्रेस सरकारच्या दारूबंदीच्या पुरस्कारामुळं लौकरच या व्यसनाचा पुरता निःपात होऊन भारत देश अधिक बलशाली होईल व अगदीं नजीकच्या काळांत सुखसमृद्धीच्या शिखरावर आरूढ झालेला दिसेल अशी खात्री बाळगावयास हरकत नाहीं. असो.

मागील प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणे प्रो. दौलतराव हे आपल्या मित्राकडे-डॉ. रमानाथाकडे—दुसऱ्या दिवशीं जायला निघाले. त्यांचें मन दचकत होते; पण ते निश्चयानं पाय उचलून गेलेच.

डॉक्टर रमानाथ हे हल्ली सरकारच्या दारूबंदी समितींत सभासद म्हणून दाखल झालेले होते. दारूबंदीचें धोरण व कार्य त्यांना पूर्णपणें पसंत होतें. त्यांनीं मानसशास्त्रदृष्ट्या ' मनुष्याची दारूची संवय कशी सुटेल ' याचा बराच अभ्यासहि केलेला होता आणि त्यांनीं त्या दृष्टीनें आपल्या कांहीं पेशंटची सवय कायमची सोडविलिहि होती. दारुड्या इसमांना नीरा पिण्याची संवय लावल्यास त्याची दारू निश्चित पण हळूहळू सुटेल असा त्यांचा दृढ विश्वास होता व म्हणून ते अलिकडे आपल्या रोग्यांना-दमेकऱ्यांना सुद्धां-पेटंट औषधे फारशीं देत नसत. साऱ्यांना ते नीरा केंद्रा-वर पाठवून नीरा घेण्यास सांगत व तोच प्रयोग ते आपला मित्र प्रो. दौलतराव याच्यावरहि आज करणार होते.

दौलतराव त्यांच्याकडं आले तेव्हां ते आपल्या दवाखान्यांत कंपौंडरला कांहीं सूचना देण्याचें काम करीत होते. दौलतरावांना पहातांच त्यांनीं स्मितहास्यानं त्यांचं स्वागत केलं. बाजूच्या खुर्चीवर दौलतराव आसनस्थ झाले. त्यांनी चहूंबाजूला मान फिरवून पाहिलं. फारच प्रसन्न असं वाता-वरण वाटलं त्यांना तिथलं! समोरच्या निळ्या रंगाच्या भिंतीवर एक बोर्ड टांगला होता. त्यावर मजकूर लिहिला होताः—

**" दारू हा विषाचा प्याला आहे ! नीरा हें पौष्टिक पेय आहे. "**

नीरा हें पेय मादक नाहीं. त्यांत मद्यार्कांचा जरासाहि अंश नाहीं.

खजूरी, नारळ, ताड आणि सागू या साखर देणाऱ्या ताड जातीच्या झाडांच्या ताज्या रसाला 'नीरा' म्हणतात. शास्त्रीय संशोधन आणि कित्येक वर्षांचा अनुभव यावरून नीरेंत मुळींच मद्यार्क नाहीं याबद्दलची संशोधकाची खात्री पटलेली आहे. ताजी नीरा पिणें हें शरीराला फार हितावह आहे. ती पौष्टिक व पाचक आहे म्हणून बंधूंनो, दारू पिऊं नका, नीरा प्या ! लक्षांत ठेवा,

**दारू हा विषाचा प्याला आहे ! नीरा हें पौष्टिक पेय आहे.**

दारूबंदी समिति मुंबईकडून प्रकाशित.

सदरचा मजकूर दौलतरावांनीं पुन्हा पुन्हा मनाशीं वाचला. अशाच दुसऱ्या दारूबंदीच्या म्हणीवरूनहि त्यांनीं नजर फिरविली. त्यांच्या मनावर त्या तिथल्या वातावरणाचा फारच अनुकूल असा परिणाम झाला. आपला मित्र करीत असलेल्या दारूबंदीच्या चांगल्या कार्याबद्दल त्यांच्या मनाचा अनुकूल ग्रह झाला. आपल्याला असा मार्गदर्शक मित्र लाभल्याबद्दल त्यांच्या दुबळ्या होत चाललेल्या मनाला फार फार समाधान वाटलं.

डॉक्टर रमानाथ आपल्या दवाखान्याच्या नेहमींच्या कामांतून मोकळे होतात तोपावेतों तिथं करमणूक केंद्रावर जाण्याकरतां म्हणून आणखी कांहीं इसम येऊन दाखल झाले. त्या सर्वांना बरोबर घेऊन डॉक्टरसाहेब प्रथम दारूबंदी ऑफिसांत जाऊन दाखल झाले. तिथं निरनिराळ्या विद्वान् लोकांची 'दारूबंदी' विषयावर चर्चा चालली होती. त्या चर्चेंत डॉ. साहेबांनींहि थोडा वेळ भाग घेतला व त्यांच्याजवळ बसून प्रो. दौलतराव ती चर्चा लक्ष लावून ऐकत होते.

चर्चा संपल्यावर श्री. भवानराव हें डॉक्टरांना म्हणाले, "खरंच, आपल्या सरकारनं दारूबंदीकरतां सुरू केलेल्या करमणूक केंद्राचा गेल्या महिन्याचा प्रोग्रेस पहातां या केंद्राचा लोकांना . फार फार उपयोग होतो याची खात्री झाली आहे. अनेक प्रकारचे सुशिक्षित व अशिक्षित दारू पिणारे या केंद्रावर येऊन आपली भरपूर करमणूक करून घेतात."

"फारच छान ! ही योजना लौकरच यशस्वी होईल याची मला पण

खात्री वाटत आहे. " डॉक्टर म्हणाले.

" गेल्या महिन्यांत एकूण दहाशें पस्तीस इसमांनीं या केंद्राचा फायदा घेतला व स्वयंप्रेरणेनें यापुढें मद्याच्या एका थेंबालाहि न शिवण्याची शपथ घेतली आहे. एवढेंच नव्हे तर कांहीं अट्टल पिण्याची संवय असलेले लोक स्वतः जाहीर भाषणें करून दारूचा धिक्कार करीत आहेत. शाहीर लोकांच्या पोवाड्यांनीं तर लोकमतावर फारच उत्कृष्ट परिणाम घडवून आणला आहे." समितीचे सेक्रेटरी गोविंदराव म्हणाले.

" माझाहि अनुभव असाच आहे. करमणूक केंद्राची वाढ शहरच्या सर्व भागातून झाल्यास त्यांचा दारूबंदी कार्याला फारच मोठ्या प्रमाणांत उपयोग होईल. शहराच्या सर्व भागांतून तर तीं उघडलीं गेलीं पाहिजेतच; पण प्रत्येक लहानमोठ्या खेड्यावरहि एक एक केंद्र सुरू केलें गेलें पाहिजे. केंद्रावर लावलेल्या निरनिराळया प्रकारच्या म्हणी, तक्ते, चित्रे याचाहि लोकांच्या मनावर उत्कृष्ट असा परिणाम होतो. शिवाय पोवाडे, पद्यें, नाटिका, संवाद यांनींहि बराचसा कार्यभाग सफळ होतो. " मिस्टर विनायकराव दंडवते म्हणाले.

" याशिवाय नीरा केंद्रामुळें तर चांगले चांगले सुशिक्षित व्यसनीदेखील स्वयंप्रेरणेनें दारूच्या थेंबालाहि न शिवण्याच्या शपथा घेत आहेत. " डॉक्टर रमानाथांनीं पुस्ती जोडली.

" एकंदर दारूबंदीचें कार्य असेंच नेटानें चालू राहिल्यास आपल्या स्वतंत्र भारतांतून या घातकी व्यसनाचें त्वरित निर्मूलन झाल्याशिवाय रहाणार नाहीं असा दृढ विश्वास वाटूं लागला आहे. आपल्या परमपूज्य बापूजींच्या मनांत फार फार होतें कीं, ' या माझ्या भारतांत कोणीहि मनुष्य दारूच्या एका थेंबालाहि शिवतांना दिसूं नये. ' आतां त्यांची ती अपुरी राहिलेली मनीषा लौकरच पूर्ण झालेली दिसेल याची पूरेपूर खात्री वाटूं लागली आहे. चला आतां सर्वजण करमणूक केंद्रावरच जाऊं या ! " दे. भ. कृष्णराव सर्वांकडे पाहून खुर्चीवरून उठत म्हणाले.

सर्वांबरोबर दौलतरावहि उठले व ते सारे दारूबंदीकरतां सुरू केलेल्या करमणूक केंद्रावर येऊन दाखल झाले. तेथें डॉक्टरसाहेबांनीं दौलतरावांना

स्वतःबरोबर फिरवून साऱ्या गोष्टींची माहिती करून दिली. मोठ्या दर्शनी बोर्डावर आज व्हावयाचा कार्यक्रम लिहिला होता. त्यांत आज सायंकाळीं कलकत्त्याचे एक मानसशास्त्रवेत्ते श्री. सुरेश मुजुमदार यांचें 'दारूबंदी' या विषयावर हिंदी भाषेंतून जाहीर व्याख्यान होणार असें लिहिलें होतें.सारा भाग दाखवून झाल्यावर डॉक्टर त्यांना शेजारच्या नीरा केंद्रावर घेऊन गेले.

नीराप्राशन चालू असतां दौलतरावांनीं करमणूक केंद्राचा आपल्या मनावर फारच चांगला परिणाम झाल्याचें डॉक्टराजवळ खुल्या दिलानें कबूल केलें व आपण आतां दररोज या केंद्राचा लाभ घेत जाऊं असें आश्वासनहि दिलें.

"पण आता माझी शेवटची विनंति ऐकशील का दौलती?" डॉक्टर त्याच्या शात नजरेकडे पहात म्हणाले.

"अवश्य ऐकेन! साग, जे सांगावयाचें तें निःसंकोचपणें सांग! मी तुला खरोखर माझा उपकारकर्ता समजतों. तूं जें सांगशील तें माझ्या हिताचेंच असणार याबद्दलची माझी खात्री आहे. खरंच तुझे उपकार मी आजन्म विसरणार नाहीं." दौलतरावानीं कृतज्ञतेनं म्हटलं.

"आतां पुनश्च दारूला हात लावावयाचा नाहीं. कबूल आहे ना तुला हें?" डॉक्टरांनीं त्यांच्यावर नजर रोखून प्रश्न केला

"कबूल! अगदीं कबूल!! अगदीं मनापासून सांगतों, पुन्हा या दारूला आजन्म स्पर्श करणार नाहीं!" दौलतराव निश्चयी स्वरानं म्हणाले.

"तुझा हा निश्चय ऐकून मला फार आनंद वाटत आहे."

"अगदीं मनापासूनच मला पश्चात्ताप झाला आहे."

"चल मित्रा, आतां घरीं जाऊं या! मला आता दवाखान्यांत गेलंच पाहिजे."

नंतर ते दोन्ही मित्र बोलत बोलत डॉक्टरांच्या दवाखान्यांत आले. तेथें कांहीं क्षण थांबल्यावर डॉक्टरांचा निरोप घेऊन दौलतराव घरीं जायला निघाले.

घरीं आल्यावर त्यांच्या चर्येवर एक प्रकारचा सात्त्विक आनंद विलसत असलेला सुनंदेच्या दृष्टोत्पत्तीस आला. तिनं हंसतमुखानं त्यांना विचारलं,

" कुठं कुठं जाऊन आलांत ? चहा करून आणूं काय, कीं ताट वाढूं ?"

" नको सुनू, मला चहा नको आहे या वेळीं. बैस अंमळ ! मग जेऊं सावकाश ! बाळाला भरवलं काय ? " त्यांनी आजूबाजूला नजर टाकीत प्रश्न केला.

" होय ! नुकतंच त्याला भरवलं व तो शेजारीं मुलांमध्यें खेळतोय. फारच बंड झालाय तो अलिकडे ! 'बाबा बाबा' म्हणून एकसारखा पाठपुरावा करीत असतो तुमचा... ! "

" होय का ? आण त्याला इकडं. त्याला केव्हां जवळ घेईन असं मला झालंय " आणि मग अत्यंत आनंदी मनानं सुनंदा अशोकला आणायला बाहेर गेली. दौलतरावांच्या आजच्या खुल्या वागणुकीनं तिच्या मनाला फार फार आनंद वाटत होता. आज कितीतरी दिवसांनीं त्यांनीं अशा प्रकारें आल्याबरोबर बाळाची विचारपूस केली होती. मदिरेच्या आहारीं गेल्यापासून त्यांची वागणूक अत्यंत तुसडी व बेपर्वाईची झालेली होती. ना कधीं प्रेमाचे दोन शब्द बोलणें कीं बाळाला घेणें ! सदानकदा दुर्मुखलेली चर्या, कसेबसे दोन घास पोटांत ढकलले कीं, चालले बाहेर भटकायला; मग रात्र असो की दिवस असो. घरीं केव्हां परत येतील याची निश्चिती अशी नसेच ! आणि या त्यांच्या असल्या चमत्कारिक वागणुकीनं सुनंदेच्या मनावर मात्र फारच विपरीत असा परिणाम झाला होता. काळजीनं ती सुकून चालली होती. दिवसेंदिवस झुरणीला लागली होती.

पण आजची त्यांची शांत वागणूक पाहून तिला पूर्वींच्या आपल्या सुखी संसाराची तीव्रतेनें आठवण झाली. मागचीं सारीं गोड दृश्यें तिच्या मनःपटलावरून झरझर सरकून गेलीं, आणि त्या गोड विचारांच्या तंद्रींतच ती बाळाला कडेवर घेऊन परत आली. अशोकला अधाशासारखे काखेंत घेऊन दौलतरावांनीं त्याचे कितीतरी मुके घेतले, मातीनं माखलेले त्याचे हात आपल्या धोतराच्या सोग्यानं त्यांनीं पुसून काढले, व मग त्याला घेऊन ते गॅलरींत येरझारा घालूं लागले. तें दृश्य पाहून सुनंदेचं प्रेमळ हृदय आनंदानं बहरून आलं. ती समोरच्या देवादिकांच्या तसबिरींना हात जोडून म्हणाली, ' परमेश्वरा, हें माझं सौख्य असंच टिकूं दे ! इकडच्या मनांत पुन्हा दारूच्या

थेंबाला स्पर्श न करण्याची सद्‌बुद्धी दे ! '

मग कितीतरी वेळ ती तें दृश्य चोरून पहात राहिली. दौलतरावांच्या हातून अशोक निसटण्याचा प्रयत्न करीत होता. त्यानं भेकाड पसरवलं होतं.

" चु...चु ऽऽऽ उगा...गप्प रहा! आपण मग बाहेर जाऊन भंभंम पाहूं, चॉकोलेट आणूं. आज आपण सभेला जाऊं...अं... तेथें फोनो ऐकूं. गाणें, नाटक खूप खूप मजा पाहूं अं." असं ते समजावत; पण तो आपला एकच हट्ट धरून बसला, "आईजवळ जाऊं ! सोडा मला ! "

नंतर बाळासह अतिप्रसन्न मनाने ते भोजनघरांत आले. तेथली टापटीप व स्वच्छता पाहून त्यांना सुनंदेचं फार कौतुक वाटलं. सारे सामान कसें व्यवस्थेनें लावून ठेवलेले दिसत होते. ती स्वच्छ कपाटे, चकचकीत भांडीं, त्या चकाकणाऱ्या बरण्या, ओळीनं लावून ठेवलेल्या कपबशा, पाटाची राग, सारं सारं कसं बहरून निघालं आहे, असं वाटलं त्यांना. मग बाळाला मोठ्या अभिमानानं सुनंदेच्या हातीं त्यांनीं दिलं व नंतर ते चहा पिऊं लागले.

आज किती दिवसानीं ते हा सुनंदेच्या हातचा चहा एवढ्या शांत मनानं पीत होते. चहा पिता पितां ते सुनंदेच्या चर्येवर राहून राहून अधाशासारखी नजर टाकीत होते. 'खरंच, मी एवढा छळ केल्यावर, एवढी उपेक्षा केल्यावर, आपल्या घरादारांत रमून जाणारी सुनंदा, माझ्या दुष्ट मनाला लगाम घालून थकलेली सुनंदा, माझ्या टेबलावरील पुष्पपात्रात दररोज ताजा फुलांचा गुच्छ खोवून देणारी, आपला पति व लाडका बाळ हेंच एक विश्व समजून त्याच्याभोंवतीच आपल्या साऱ्या आशा-आकांक्षा केंद्रित करणारी सुनंदा—ती कोठें ? आणि आपण ? किती अधम, किती पापीं दुराचारी ?... '

" हें काय, चहा सांडला ना खाली ! कुठं पहायचं तें ! " या तिच्या प्रश्नानं ते भानावर आले व अरे ऽऽ च्या करीत त्यांनीं कपांतला चहा पिऊन संपवला व नंतर ते स्नान करण्याकरतां स्नानगृहांत निघून गेले. सुनंदा ही खरोखर देवता असल्याची त्यांची 'एवढ्या दिवसांची भावना आज त्यांच्या स्वानुभवानं खरी झाली होती.' क्षणमात्र त्यांना असंहि

वाटलं कीं, तिच्याजवळ आपण क्षमेची याचना करावी, पुनीत व्हावं.

त्यांनीं गंगाळांत हात घातला. अगदीं बेताचं असं गरम पाणी, वरच्या फळीवर व्यवस्थेनं निऱ्या करून ठेवलेला सुपरफाईन धोतराचा कळणा व त्यासोबत पांढरा स्वच्छ टॉवेल, बाजूला डिश्‌मध्यें ठेवलेली हमाम साबणाची वडी,सारं सारं तय्यार होतं.हें सर्व कोणासाठीं ? आपणासाठीं ! अभिमानानं त्यांची चर्या फुलून आली. प्रसन्न चित्तानें ते एक एक वस्तू नव्या नजरेनें पाहूं लागले. साऱ्यांत त्यांना आपलेपणा भरून राहिला आहे असं वाटलं.

सुनंदेच्या बापानं आंदण दिलेलं तांब्याचं गंगाळ व घाटदार नाशकी तांब्या या वस्तूंना त्यांनीं हात लावला. आपुलकीच्या नजरेनं डोळे भरून पाहिलं. आपलं आहे ते; आपणासाठीं सारं सारं कांहीं तयार आहे. वर आल्याकड्यावरून त्यांनीं आपलेपणानं नजर फिरावली. जणूं काय, कांहीं दिवस लांबचा प्रवास करून आलेला प्रवासीच !

अन् मग ते सुग्रास अन्नाच्या वासानं दरवळून राहिलेल्या प्रसन्नशा भोजनघरांत आले. कल्हईचीं तीं चकाकणारीं भांडीं, कमोदी तांदळाचा भात, पिवळे जर्द वरण, लोणकढें तूप, बाजूला खुमासदार चटण्या, कोशिंबिरी आणि त्याचं अत्यंत आवडतं असं लिंबूचं लोणचं ! त्यांनीं मनाशी म्हटलं, ' केवढी ही माझी बडदास्त ! केवढें हे भाग्याचें लेणें ! '

" बसायचं आतां " कढीचा द्रोण ताटाजवळ ठेवीत ती म्हणाली.

" सुनंदा, पुरेपुर लाजलों मी आज ! मला क्षमा करशील ना ?" असें म्हणतांच त्यांना गहिंवर आला. तोंडांतून शब्द फुटेना त्यांच्या.

"इश्य! हें काय? असं रडायचं कां म्हणून ? झालं गेलं कृष्णार्पण समजावं! होऊन गेलेल्या गोष्टीचा शोक आतां कशाला करायचा तो ? आतां नाहीं घेतली ती म्हणजे झालं ! घ्या घास ! करा सुरवात !! " सुनंदा म्हणाली.

भरल्या पाटावर अशा रीतीनं अश्रु ढाळल्यावर दौलतरावाना एक प्रकारचे समाधान वाटलें. छातीवरचें भलें मोठें ओझें उचललें गेल्यासारखें मोकळें मोकळें वाटूं लागलें त्यांना. मग सुनंदेनांहि कांहीं न बोलतां त्यांना सावकाश जेऊं दिलं. जेवत असतांना ते मधून मधून सुनंदेच्या हालचालीकडं चोरून पहात होते. विटक्या लाल रंगाचं जुनेर ती नेसली होती; व जुन्या

धारवाडी खणाची चोळी तिनं अंगांत घातली होती. पण हें जुनेर सुद्धा तिला कसं खुलून दिसत होतं. विपुल केशसंभाराचा बुचडा तिच्या गोऱ्या पान मानेवर सहजगत्या चापचोप बसला होता. तो तिला बेमालूम खुलून दिसत होता.

अंमळशानं तिनं त्यांना शेवटचा भात वाढला व मग ते हात धुवून पाटावरून उठले. तदनंतर तिनं मुखशुद्धीकारितां करून दिलेला विडा त्यांनीं तोंडांत घातला व ते तसेंच सरळ आपल्या रीडिंग रूममध्यें जाऊन दाखल झाले.

आज कितीतरी दिवसांनीं त्यांनीं या रूममध्यें पाय टाकला होता. चारहि बाजूंच्या काचेच्या कपाटांत लेबलं लावून नंबरानं ठाण मांडून बसलेले ते नानाविध ग्रंथ, त्या कादंबऱ्या, ते ज्ञानकोश सारे सारे आपल्याला जणूं विचारत आहेत, ' कुठें होतास तूं आतांपावेतों ? ' मग त्यांचा आंतला आवाज लाजेनं म्हणे, ' दारुगुत्त्याकडं. एका हीन संस्कृतीच्या बेशरम ठिकाणाकडं ! चुकलों मी. आतां नाहीं परत जाणार त्या रस्त्याला. आज पुनर्जन्म झालाय माझा ! '

त्यांनीं फडक्यानं सारीं कपाटं पुसून काढलीं. खालची सारी जागा स्वहस्तें झाडून स्वच्छ केली. टेबलावरचा सांचलेला धुराळाहि झटकून तें स्वच्छ केलें. एकवार अभिमानानं साऱ्या खोलीभर नजर फिरवून पाहिलं. कांहीं काळ चुकलेल्या गाईला आपलें वासरू दिसावें व तिनें वात्सल्यानें त्याला डोळे भरून पहावें, चाटावें, हुंगावे, तसें त्यांनीं साऱ्या कपाटांना हातानें स्पर्श केला. तावदानं झटकली. वारा तिथं झुळक्या मारूं लागला. ते अभिमानानं खालीं वाकले. त्यांनीं किल्ल्यांचा जुडगा हातीं घेतला व नंतर एका कपाटांतून ' दारूबंदी 'च्या विषयावरचा बर्नस्मिथ या इंग्रज लेखकाचा इंग्रजी ग्रंथ बाहेर काढला व तो घेऊन ते परत सुनंदा बसली होती तिथें येऊन दाखल झाले.

दौलतरावांना आज स्टडीरूममध्यें गेलेले पाहून सुनंदेच्या आनंदाला पारावार राहिला नव्हता. बाळाला किती तरी सुंदर सुंदर गाणीं म्हणून तिनं निजवलं होतं. नंतर ती त्या रूमच्या टेबलावर नव्यानं अंथरायला म्हणून

नवीन टेबलक्लॉथ विणण्याचा उद्योग करूं लागली होती. दौलतरावांना हातांत पुस्तक घेऊन आलेलं पाहून तर, तिचा आनंद गगनात मावेना. 'लागला पुन्हा विद्येचा व्यासंग ! किती चांगली गोष्ट !' तिनं मनाशीं म्हटलं.

" काय चालवलं आहेस सुनू ?" तिच्या जवळ जात ते म्हणाले.

" टेबलक्लॉथ विणायला घेतलं आहे ! स्टडी रूमच्या टेबलावर लागेल ना ?" तिनं सानंद पहात म्हटलं.

" खरंच सुनंदा, तूं देवता आहेस ! या घराची गृहलक्ष्मी आहेस !"

" इश्श ! हे काय ? असं पुन्हा पुन्हा म्हणणं मला नाहीं आवडत ! प्रत्येक गृहिणीचं कर्तव्यच आहे तें ! कर्तव्यापलिकडे दुसरं कांहीं मी करतें, असं मला नाहीं वाटत !"

एवढं बोलून ती अंमळ थाबली. दौलतराव अनिमिष नेत्रांनीं तिच्याकडे नुसते पहात राहिले.

" आणि हे काय ? कुठं जायचंय् काय ?" त्यांच्याकडे आपादमस्तक पहात ती म्हणाली.

"होय ! बाहेर जायचंय मला. पण कुठं ? पूर्वीप्रमाणं अनिश्चित मार्गाकडं नव्हे, तर सरकारच्या दारूबंदीच्या करमणूक केंद्रावर ! तिथं आज 'दारूबंदी' या विषयावर एका बंगाली तत्त्ववेत्त्याचं भाषण होणार आहे तें ऐकायला. आतां यापुढें मी सुद्धां दारूबंदीच्या कार्यक्रमांत स्वतः भाग घेणार आहे व माझ्यासारख्या भावनेच्या आहारीं जाऊन वाममार्गाला लागलेल्यांना सुधारणेच्या मार्गावर आणण्याचें काम करणार आहें. या पवित्र कार्याला तुझा आशीर्वाद आहे ना ?"

" इश्श ! आशीर्वाद ? आणि तो देणारी मी कोण ? तें काम त्या दयाघन प्रभूचें आहे. तो तुमच्या अंगिकृत कार्यांत खात्रीनं यश देईल ! पण हें काय ? चहा न घेतांच जाणं होत आहे ! थांबा नं अंमळ !"

"नको नको ! मला या वेळीं मुळींच चहाची आवश्यकता नाहीं. आतां मी जातों " आणि असें म्हणत ते चालूं लागले व मग तें दिसेनासे होईपावेतों ती कितीतरी वेळ त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडं मोठ्या औत्सुक्यानं पहात राहिली.

---

# प्रकरण ६ वें



कलकत्त्याचे सुप्रसिद्ध पुढारी दे. भ. सुरेश मुजुमदार यांचें आज सरकारनें दारूबंदीकरतां चालाविलेल्या करमणूक केंद्रावर ' दारूबंदी ' या विषयावर जाहीर व्याख्यान व्हावयाचें होतें. करमणूक केंद्र हे मुंबईच्या सुंदरपूर या मनुष्यांनी गजबजलेल्या वस्तीत सरकारनें सुरू केले होते. त्या केंद्राचा फायदा आतांपावेतों हजारों लोकांनीं करून घेतला होता. तेथे नेहमीं ' दारूबंदी ' या विषयावर निरनिराळ्या नाणावलेल्या वक्त्यांचीं भाषणें होत असत. नामांकित शाहीर आपल्या दारूबंदीवर रचलेल्या पोवाड्यांनीं साऱ्या जनतेला दारूचे दुष्परिणाम पटवून देव असत. दारूमुळें हजारों लाखों कुटुंबांची वाताहत कशी झाली व होत आहे हे समर्पक पटावें म्हणून लहानमोठीं नाटकेंहि तिथं केलीं जात होतीं. निरानिराळे कार्यतत्पर अधिकारी सरकारने खास या कामावर नेमलेले होते.

कामगार वस्तीच्या अगदीं लगत हें केंद्र सरकारनें सुरू केले होतें. त्यामुळें गिरणी सुटली म्हणजे व गिरणीला सुटी असली म्हणजे, सारे मजूर या केंद्राचा पुरेपूर फायदा घेत. भागिनीवर्गहि बहुतेक छोट्या मोठ्या कार्यक्रमाला स्वयप्रेरणेने हजर राही. केव्हां केव्हां मुख्य प्रधानमंत्रि व इतर सर्व मंत्रिमहाशय या केंद्राला भेट देऊन जात व जरूर त्या सूचनाहि करीत. अबकारी खात्याचे मंत्रि हे तर दररोज तिथं एक फेरी मारल्याशिवाय रहात नसत. केंद्राच्या आवाराच्या मुख्य दरवाजाच्या कमानीवर पूज्य महात्माजींचा एक मोठा फोटो लावला होता व त्याला दररोज ताज्या फुलांचा हार घातला जात होता. कोणीहि प्रवेशद्वाराजवळ आला म्हणजे त्या मंगल मूर्तिपुढें त्याचे हात अनाहूतपणें जोडले जात. प्रथमदर्शनींच ह्या राष्ट्रपित्याचें दर्शन झाल्यानें प्रत्येक इसम आपल्या हृदयांतलें मालिन्य धुवून मोठ्या पावित्र भावनेनें आंत जात असे आणि मग तेथल्या त्या पाठोपाठ सुरू असलेल्या नानाविध कार्यक्रमांमुळें त्याच्या मनांत दारूबद्दल भयंकर चीड उत्पन्न होत असे व तो दारूला असंख्य शिव्याशाप देतच तेथून बाहेर पडत असे.

डे. भ. सुरेश मुजुमदार हे शास्त्रवेत्ते होते. दारूबद्दल त्यांनीं निर-निराळ्या भाषेंतील ग्रंथांचें वाचन व मनन केलेलें होतें. मद्रासच्या काँग्रेस मंत्रिमंडळानें त्यांना आपल्या प्रांतांत आग्रहानें बरेच दिवस ठेऊन घेतलें होते; व तेवढ्या अवधींत त्यांनी अनेक गांवीं जाहीर सभा घेऊन दारू-बंदीचा कार्यक्रम पूर्णपणें यशस्वी करून दाखविला होता. मद्रास प्रांताचा यशस्वी दौरा आटोपून ते स्वप्रांतांत रवाना होणार होते; परंतु एका व्याख्या-नाचा तरी लाभ मुंबईकर जनतेला मिळावा अशी विनंति अबकारी खात्याचे मंत्रिमहाशय यांनीं त्यांना केल्यावरून आज त्यांचें विद्वत्ता-प्रचुर व्याख्यान करमणूक केंद्राच्या भव्य मैदानावर होणार होते.

व्याख्यानाची सर्व पूर्वतयारी फारच उत्कृष्ट अशी केली होती. मोठें व्यासपीठ मुद्दाम तयार केलें होतें. खालीं खुर्च्यांच्या दुतर्फा रांगा मांडल्या होत्या. असंख्य मजुरांना बसण्याकरतां साऱ्या पटांगणांत जाजमें अंथरलीं होतीं. भागिनीवर्गाकरतांहि निराळा स्वतंत्र मांडव केला होता. व्याख्या-नाला दारूबंदी खात्याचे मंत्रिमहाशय, निरनिराळे सरकारी नोकर, वर्त-मानपत्रकार हजर रहाणार होते. लाउडस्पीकरची योजनाहि जय्यत तयार होती.

दौलतराव त्या ठिकाणीं केव्हांच येऊन हजर झाले होते. त्यांच्या हातांत मद्याचे दुष्परिणाम यावरील एक इंग्रजी ग्रंथ होता; तो ते मधून मधून वाचीत होते. व्याख्यान सुरू व्हायला अजून वीस मिनिटांचा अवधि होता. सारें पटांगण माणसांनीं फुलून गेलें होतें. दौलतराव ज्या रांगेतील खुर्चीवर बसले होते ती रांग देखिल श्रोत्यांनीं पूर्ण भरून गेली होती. एकहि खुर्ची मागें किंवा पुढें रिकामी पडलेली दिसत नव्हती. व्याख्यान सुरू होईपावेतोंचा मधला वेळ दौलतराव असा सत्कारणीं लावत आहेत हें दृश्य त्यांच्या पाठीमागच्या रांगेंत बसलेले त्यांचे पूर्वीचे जिगरदोस्त प्रो. रंगराव, ॲडव्होकेट चंद्रराव, प्रो. रत्नपारखे हे पहात होते. डॉक्टर रमानाथ दारूबंदी समितीचे सभासद म्हणून व्यासपीठाकडे जरूर तो बंदो-बस्त राखण्याचें काम करीत होते.

नंतर योग्य वेळीं व्याख्याते दुसऱ्या बड्या अधिकाऱ्यांसह व्यासपीठावर

येऊन हजर झाले. साऱ्या श्रोतृवृंदानें टाळ्यांचा गजर करून त्यांचें स्वागत केलें. व्याख्यात्यांनीं जनतेच्या सत्काराचा हात जोडून सस्मित स्वीकार केल्यावर ईशस्तवन गीतास सुरवात झाली व महात्माजींच्या फोटोला भक्तिभावानें नमन करून सर्व मंडळी आसनस्थ झाली. सुरवातीला समितीचे अध्यक्ष श्री. गोविंदराव यांनी आजच्या व्याख्यात्यांची दोन शब्दांत ओळख करून दिली व मग त्यांना भाषणास सुरवात करण्याची विनंति केली. उभे राहून व सर्वांना अभिवादन करून मुख्य वक्ते दे.भ. सुरेश मुजुमदार यांनीं बोलावयास सुरवात केली. साऱ्या सभामंडपांत निःशब्द शांतता पसरली. महाशय मुजुमदार म्हणाले, " उपस्थित बंधूंनो व भगिनींनो, आज मला येथें येऊन 'दारूबंदी' या विषयावर दोन शब्द बोलण्याची संधि दिली याबद्दल मी आपल्या दारूबंदी समितीचे फार फार आभार मानतों. मी गेले कांहीं दिवस मद्रास प्रांतांत याच विषयावर प्रचारकार्य करीत होतों. मद्रासच्या मंत्रिमंडळानें आपल्या प्रांतांतून दुसऱ्या अनेक अडचणींना न जुमानतां दारूचें संपूर्ण उच्चाटन करण्याचे कामांत संपूर्ण यश मिळविलें आहे. तेथल्या सरकारला ही योजना एवढ्या तडकाफडकीं यशस्वी करण्याच्या कामांत बरेच अडथळे आले, अनेक प्रकारच्या अडचणी आडव्या आल्या; दारूबंदी एवढ्या अल्पावधींत संपूर्णतया अमलांत न आणतां आस्ते आस्ते करावी असें कांहीं मद्रासी पुढाऱ्यांचें म्हणणें होतें त्या प्रांताला दारूचें उत्पन्न फार मोठें आहे. एवढ्या मोठ्या उत्पन्नाला आजच फाटा देऊन संपूर्ण दारूबंदी घडवून आणणें म्हणजे खरोखर मोठें धाडस होय; पण तेथील प्रांतिक सरकार या भीतीच्या बागुलबोव्याला डरलें नाहीं. त्यांनीं असेंब्लीच्या सभागृहांत दारूबंदीच्या साऱ्या विरोधकांना निक्षून सांगितलें कीं, ' सरकार या मद्रास प्रांतांत संपूर्ण दारूबंदी करणार ! करणार !! करणार !!! ' ( टाळ्या ) आणि खरोखर त्याप्रमाणें आतां तिथं तुम्हांला कोठेंहि दारूचा एक थेंब सुद्धां दृष्टीला दिसावयाचा नाहीं. त्या गोष्टीचें श्रेय मंत्रिमंडळाप्रमाणेंच जनतेलाहि दिलें गेलें आहे व तें यथायोग्यच आहे. तेथील आम जनतेनें सरकारच्या दारूबंदीच्या धोरणाला उचलून धरलें, त्याच्याशीं पूर्णपणें सहकार्य केलें, आणि म्हणूनच तिथें आज दारूबंदीचा

प्रयोग पूर्णपणे यशस्वी झालेला दिसत आहे. मद्रास प्रांताप्रमाणेंच इतर सर्व प्रांतांतूनहि आता लौकरच या राक्षसीचें भूत संपूर्णपणें गाडले जाईल यांत संदेह नाही. ( टाळ्या ) आपले राष्ट्रपिता महात्माजी यांचा या कार्याला अगदीं प्रथमपासून आशीर्वाद आहे. या स्वतंत्र भारतातून ज्या वेळीं दारूचे संपूर्ण उच्चाटन झालेलें दिसेल, दारूचा एक थेंबहि कोणाच्या दृष्टीला पडणार नाहीं असा सोन्याचा दिवस उगवलेला असेल, त्याच वेळीं पूज्य बापूजींच्या आत्म्याला खरी शांति लाभेल. बापूजींची ही अपुरी राहिलेली मनीषा तुम्हीं सरकारशीं सहकार्य करून पूर्ण करणार नाहीं काय ! मला तर खात्री आहे कीं, मद्रास प्रांतांतील लोकांप्रमाणेंच मुंबई प्रांतांतील जनताहि आतां विलंब न लावता सरकारच्या या दारूबंदीच्या योजनेशीं पूर्ण सहकार्य करील व या प्रांतातूनहि दारूचें नांव संपूर्णपणें नाहींसें करील !

''जर दारूचा एकहि थेंब आपल्या देशांत दिसावयास नको असे तुम्हांस मनापासून वाटत असेल तर तुम्हीं आजच या ठिकाणीं प्रतिज्ञा घ्या कीं, 'यापुढें मी आजन्म दारूला शिवणार नाहीं व सरकारच्या धोरणाशीं संपूर्णपणें सहकार्य करीन.'

''बंधूंनो, सरकारनें पुष्कळ कायदे केले,चागल्याचांगल्या योजना आंखल्या, पण त्याला जर तुमची एकदिलानें संमति मिळाली नाहीं व त्या कायद्यांशीं आणि योजनांशीं तुम्हीं सहमत झाला नाहींत तर तें कार्य केव्हांहि यशस्वी होऊं शकणार नाहीं. हातीं घेतलेली कोणतीहि योजना चुटकीसरशीं घडवून आणणें जनतेच्या निश्चयावरच सर्वस्वीं अवलंबून असतें. तुम्हीं होऊन जर दारूच्या एका थेंबालाहि न शिवण्याचा मनापासून निश्चय केला तर त्याला कायदा करण्याचीहि जरूरी नाहीं. लक्षांत घ्या, आतां आपला भारत देश स्वतंत्र झाला आहे. या स्वतंत्र भारतांत, या वैभवशाली हिंदुस्थानांत,या परमपूज्य बापूजींच्या हिंदभूमींत दारूचा एक थेंबहि दृष्टोत्पत्तीस येऊं नये अशी साऱ्या थोर थोर नेत्यांची मनीषा आहे. तेव्हां करणार ना तुम्हीं या दारूबंदीच्या योजनेशीं सहकार्य ! ( होय होय असा आवाज. )

''येथें हजर असलेल्या सुशिक्षित पदवीधरांना व सरकारी नोकरवर्गालाहि माझी कळकळीची विनंति आहे कीं, :दारूबंदीचें कार्य यशस्वी व्हायला

तुम्ही प्रत्येकानें वेळात वेळ काढून घरोघरीं जाऊन प्रचारकार्य केलें पाहिजे. दारूबद्दल समाजांत तिटकारा निर्माण केला पाहिजे. हें महत्त्वाचें कार्य तुमच्या शिरावर आहे. सरकार करील या समजुतीनं तुम्ही स्वस्थ बसतां उपयोगाचें नाहीं. इथं या वेळीं शहरातील चांगले चांगले पदवीधर लोक जमलेले आहेत. कोणी प्रोफेसर आहे, कोणी वकील आहे, कोणी डॉक्टर, शास्त्रज्ञ, व्यापारी, कारखानदार इ. सर्व प्रकारचे लोक आहेत कामगारबंधू तर बहुसंख्येनं हजर आहेत. तुम्हा सर्वांना माझी पुन्हा पुन्हा कळकळीची विनंति आहे की, या दारूच्या भुताला आतां कायमचें जमिनींत गाडून टाका. दारूचा एक थेंबहि आपापल्या क्षेत्रांत दिसणार नाहीं अशी परिस्थिति तुम्ही निर्माण करा. विशेषत: सुशिक्षित, समंजस अशा वर्गाला मी हेंच सांगतो कीं, तुम्ही जितके निर्व्यसनी, सु-विचारी व सुसंस्कृत असाल त्या प्रमाणात तुम्हा सभोवारची जनता निर्मळ, सुदृढ, व निर्व्यसनी होईल. तुम्ही समाजाचे आदर्श आहांत. जें कार्य करण्याचें तुम्ही मनांत आणाल त्याप्रमाणें त्याची फळें राष्ट्राला दिसतील. महात्माजींचे रामराज्य तुमच्या सहकार्यानेच निर्माण होईल, याबद्दल शंका नाहीं. स्वराज्याचे सुराज्य बनविणे तुमच्या हातांत आहे. कारण भावी पिढीचें हित व आहित तुमच्या व्यक्तिश: आचरणावर व ससंस्कृतपणावर अवलंबून आहे. ( टाळ्या )

"मनुष्याची सहजप्रवृत्ति ही चांगली का वाईट? हा एक वादग्रस्त प्रश्न असून एका दृष्टीनें ती नीतिशास्त्राची बाब आहे. उत्क्रांतीवादी असें मान-तात कीं, वन्य रानटी अवस्थेमधून उत्क्रांत होत गेलेल्या मनुष्यात विचा-रानें संयमाची शक्ति आली असली, तरी मूळ विकारवशता हा पाशवी प्रवृत्तीचा अंश आजच्या विसाव्या शतकामधील सुधारलेल्या मानवांमधून नाहींसा झालेला नाहीं; तो सुप्त असतो इतकेंच. संयम किंवा विचारशक्ति हेंच खरेंखरें सुधारणेचे लक्षण होय. मद्याचा विशेष परिणाम या संयम-शक्तिवरच होत असतो.

"अगदीं सात्त्विकांतील सात्त्विक अशा द्रव्याचें–अमृताचेंहि–अतिसेवन केलें असतां शरिरांत विकृति उत्पन्न होते, आणि मग त्याचा परिणाम

मानसिक शक्तीवर होऊन संयमशक्तिहि नष्ट किंवा विकृत होते. परंतु मद्याचे अल्पसेवनानाहि परिणाम मेंदूवर म्हणजे संयमशक्तीवर तात्काळ होऊन त्या विकृतावस्थेत मनुष्याचे हातून काय काय घडेल तें सांगतां येणें कठीण आहे. मद्यसेवनाचा शरीरावर कसकसा विपरीत परिणाम होतो हें शास्त्रीय दृष्ट्या मागणेस वेळ पुरणार नाहीं. तथापि वृत्तींतील आतुरता वाढविणें हा मद्याचे सेवनांतला मोठा दुर्गुण आहे. मद्याच्या अतिसेवनानें माणसाच्या साऱ्या वृत्ति पुरेपूर बधीर होऊन जातात व शेवटीं माण-साला वेड देखील लागते. मद्याचे सेवनानें भ्रमिष्ट होऊन कायमचे वेडे झाल्याचीं उदाहरणे शेंकडोंनीं दाखवितां येतील.

''मद्य हें एक उत्तेजक पेय आहे, एवढे नुसतें म्हटल्यानेंच त्याची तरफ-दारी केल्यासारखी होणार असून त्याच्या अवगुणाची बाजू झाकून टाकल्या-सारखें होणार आहे; आणि अशाने सामान्य माणसाची फसगत होण्याचा बऱ्याच अंशीं संभव आहे. आता या ठिकाणीं असा एक प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं, मग वैद्य लोक मद्याचा उपयोग कांहीं ठराविक औषधामधून करतात ते कां ? पण बंधूंनो ! लक्षांत घ्या कीं, वैद्य लोक वैद्यकीय दृष्ट्या कांहीं कांहीं औषधांमधून मद्याचा उपयोग करतात तो अपवादात्मक असतो आणि या गोष्टीवरहि आतां सरकारनें संपूर्ण विचारांतीं बऱ्याच मोठ्या प्रमाणावर बंदी घातली आहे. अशा प्रकारच्या कोणत्याहि औषधांत—मग तीं आसवे असोत वा अरिष्टें असोत—मद्याची जरा सुद्धां गरज नाहीं असे मोठमोठ्या संशोधकांनी सप्रमाण सिद्ध केलें आहे; आणि मद्याची किंचित अंशरूपानेंहि जरूर न ठेवतां वैद्य लोकांचें चालूं शकते असेंहि त्यांनीं सिद्ध करून दिलें आहे. साऱ्या पाश्चात्य संशोधकांचीहि खात्री झाली आहे कीं, मद्यसेवनानें येणारें कृत्रिम उत्तेजन हें निसर्ग-प्रवृत्तीशीं सर्वस्वीं विरोधी असे आहे, व त्याची होणारी प्रतिक्रियाहि तित-कीच तीव्र अतएव घातुक आहे कृत्रिम उत्तेजन हें केव्हांहि घातुकच ! त्याचा अनुभव घेण्यासाठीं खरोखर एवढी शोधाशोध करण्याचेंहि कारण नाहीं. मद्याचा उत्तेजक पेय म्हणून केव्हां केव्हां औषधासारखा उपयोग करण्याचा परिणाम शेवटीं कायमच्या संवयींत रूपांतर करतो आणि हाच

त्याचा भयंकरपणा मनुष्याच्या सर्वस्वनाशास कारणीभूत होतो.

"दारूंत कोणताहि जीवनांश नसलेनें तिचें सेवन करून मद्यपी लोक स्वतःच्या शरीराचा, कुटुंबाचा व पर्यायानें सर्वस्वाचाच होम करतात; आणि स्वतःच्या अपत्यांना जगांत निराधार व निर्धन करून सोडून देतात. दारूचे दुष्परिणाम गरीब [illegible] लोकांवर ताबडतोब होत असतात. जीवन-सत्त्वें नसलेली दारू हा अग्नि आहे. जठराग्नीमुळें अन्नाचा जीवनरस तयार होऊन आपल्या शरीराचें पोषण होतें. पण मद्याचा अग्नि हा जठराग्नी-लाहि पचवून टाकणारा असा राक्षसी कोटींतला आहे. गरीब परिस्थितींतल्या लोकांचें अन्न अगोदरच निःसत्त्व असें असतें. अर्थात् ते मद्याच्या अग्नीला जाळण्यास कसे पुरणार ? दुधातुपाच्या वाट्या रिचविणारा श्रीमंत मद्याचे दुष्परिणामाचा अतिरेक थोडा काल लांबवूं शकतो; पण गरिबांचीं शरीरें तो दुष्परिणाम तात्काळ जाहीर करतात. मद्यसेवनानें मनोव्यापारांवर संयम राहात नाहीं, मनोवृत्ति विकृत होतात आणि विकृत मनोवृत्ति हेंच गुन्हे-गारीचें मुख्य लक्षण होय हें ध्यानांत आलें म्हणजे, 'मद्य, दारू आणि गुन्हेगारी' याचा संबंध लक्षांत येण्यास उशीर लागणार नाहीं.

"अनेक शास्त्रज्ञ लोकांच्या अभिप्रायावरून असें स्पष्ट सिद्ध झालें आहे कीं, एकंदर घडणाऱ्या गुन्ह्यांत शेकडा ७५ गुन्हे केवळ मद्याचा अतिरेक केल्यामुळें घडून आलेले असतात. इंग्रज लेखक जनरल बूथ यानें इंग्लंडच्या समाजास्थितीवर विदारक प्रकाश पाडणारें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत तो लिहितो, 'समाजाच्या निकृष्टावस्थेच्या कारणांत दारूला ९० टक्के स्थान आहे.' तसेंच पाश्चात्य देशांतल्या कित्येक न्यायाधीशांनीं असें स्पष्ट मत व्यक्त केले आहे कीं, 'दारूमुळेंच तिकडील कोर्टें चालली आहेत; जर दारूचा एकहि थेंब दृष्टोत्पत्तीस पडणार नाहीं तर देशाला एवढ्या न्यायालयांची खासच जरूर भासणार नाहीं.'

"मद्याचा मोह हा इतर मोहांपेक्षां आवरण्यास कठीण असा मोह आहे. त्याकरितां मोह पडूं नये म्हणून मद्याचा व्यापारच बंद करणें ही एकमेव उपाययोजना सरकारनें प्रथमतः हातीं घेतली आहे आणि आतां या मुंबई प्रांतांत तुम्हांला एकहि दारूगुत्ता कुठेंहि उघडा असलेला आढळणार

नाहीं. दारूची संवय सुटावी म्हणून सरकारनें नीराकेंद्रे ठिकाठिकाणीं सुरू केलीं आहेत. नीरा ही पाचक व पौष्टिक असून तिच्या प्राशनानें दारूची लत आस्ते आस्ते पण निश्चितपणें सुटण्यास फार मदत होते. शिवाय करमणूक केंद्राचाहि दारूबंदीच्या कार्याला फारच चांगला उपयोग होतो असें अनुभवानें सिद्ध झाले आहे. म्हणून माझी तुम्हां साऱ्यांना पुन्हा पुन्हा कळकळीची विनंति आहे कीं, आतां दारूचें नांवच विसरा. या राक्षसीनं आतांपावेतो असंख्य कुटुंबाचं वाटोळं केलं आहे. आता आपल्या या स्वतंत्र भारतांत दारूचा एकहि थेंब कुणाच्या नजरेला पडूं नये अशी सरकारची फार फार इच्छा आहे. आपला भारत देश पूर्वीसारखा बलशाली व वैभवसंपन्न व्हावा, साऱ्या देशबांधवाचे आरोग्य चांगल्या उत्कृष्ट प्रतीचें रहावें, ते नीतिमान बनावेत,भारतभू पूर्वीसारखी सुजला सुफला रहावी अशी साऱ्या काँग्रेस नेत्यांची फार मनीषा आहे आणि तशीच मनीषा साऱ्यांनीं सुदृढ बनावं, आदर्श गृहराज्य निर्माण करावं, शिवाजी महाराजांसारखे मर्द गडी या भारतभूमीच्या कुशीतून जन्मावेत अशी पूज्य बापूजींची अपुरी राहिलेली आहे. भारताला ज्या दिवशीं स्वातंत्र्य मिळालं त्याच दिवशीं बापूजींच्या तोंडून उद्गार निघाले कीं, 'या माझ्या स्वतंत्र भारतांत आतां दारूचा एक थेंबहि दिसावयास नको.' हें त्यांचे म्हणणें खरें करून दाखविण्याची आतां प्रत्यक्ष वेळ आलेली आहे.

"कामगारबंधूंनाहि माझी हीच विनंती आहे. आतां तुम्ही या दारूचे नांव विसरा. 'दारू' हा आपल्या दरिद्री हिंदुस्थानाला मोठा शाप आहे. दारूचें कोडो रुपयांचें उत्पन्न तुमच्या निढळाच्या घामावरचें होतें. परक्या राज्यकर्त्या लोकांनीं तुमचे रक्त शोषलें तेवढें पुरें नाहीं का झालें? आतां साराच जमाना पालटला आहे. सरकारनं दारुगुत्ते बंद केलेत म्हणून आडमार्गानं दारू विकणारे कांहीं हरीचे लाल समाजांत उत्पन्न झाले आहेत. लक्षांत ठेवा, हे लोक दारूबंदीचे खरेखुरे शत्रू आहेत. त्यांना पकडून पौलिसांच्या स्वाधीन करा. ( टाळ्या )

"दारूबंदी जारी झाल्यापासून तुमचा मजूर लोकांचा थोडा का फायदा झाला? तुमच्या बायकामुलांच्या अंगावर लक्तरं होतीं त्या जागीं आतां

चांगलीं लुगडीं दिसूं लागलीं आहेत;तुमचीं गालफडं बसलीं होतीं, आतां त्यांवर मांसलपणा आला आहे; मुलांना कपडे नव्हते, ते शाळेत जात नव्हते,आतां ते ऐटदार कपडे पेहेरून आनंदानं शाळेंत जातांना दिसतात; कशाचा हा प्रभाव ? हा सर्व सरकारच्या दारूबंदीचा प्रभाव आहे ! अशाच सहकार्यानं तुम्ही वागलांत तर ' दारूबंदी ' ची योजना इथं संपूर्ण यशस्वी झालीच असं खात्रीनं समजा. परमेश्वर तुम्हांला तशी सद्बुद्धि देवो अशी त्या जगन्नियंत्याची प्रार्थना करून मी माझें भाषण पुरें करतो. त्यापूर्वी म्हणा—

**' दारू पीना हराम है ! दारू पीना हराम है ! ' "**

टाळयांचा प्रचंड कडकडाट झाला व दारू पीना हराम है या आरोळ्यांनीं तिथलं वातावरण कांहीं वेळ दुमदुमून उठलं. नंतर मंत्रिमहाशयांचें समयोचित असे छोटेंसेंच पण परिणामकारक असें भाषण झालें व मग आभार मानल्यावर वंदे मातरम् गीत होऊन सभा बरखास्त झाली.

कार्यक्रमाच्या समाप्तीनंतर दौलतरावाना त्यांचे सारं जुने मित्र भेटले. त्यात प्रो. रंगरावहि त्यांना भेटले. कुशल प्रश्न झाल्यावर रंगरावांनीं त्यांना दुसरे दिवशीं अगत्यानं आपल्या घरीं येण्याचं आमंत्रण दिलं. बाकीच्या साऱ्यांनीं नुसत्या उत्फुल्ल नजरेनं त्यांचा गौरव केला आणि त्या सर्वांना हंसतमुखानं अभिवादन करून दौलतराव तडक आपल्या घरची वाट चालू लागले.

———

# प्रकरण ७ वें



आतां दौलतरावांनीं खरोखरच दारू कायमची सोडली, हें सांगावयास नकोच ! क्षणिक वैराग्य म्हणून नव्हे, तर अगदी मनापासून व कायमचीच ! त्यांचा दिवसाचा सारा वेळ करमणूक केंद्रावर व आपल्या स्टडीरूममध्येंच जाऊं लागला. पूर्वीप्रमाणेंच त्यांच्या चर्येवर मराठशाही तेज विलसूं लागलें. दारूबंदीच्या बहुतेक कार्यक्रमांना ते जातीनें हजर राहून इतर दुसरींहि तत्संबंधीं कामें करूं लागले. त्यांच्या या उत्साहाचा डॉ. रमानाथांनीं बरोबर उपयोग करून घेतला. त्यांनी एक दिवस ‘ दारूबंदी ’ या विषयावर त्यांचे मुद्दामच जाहीर व्याख्यानाचा कार्यक्रम घडवून आणला व त्याप्रमाणें दौलतरावांनींहि मोठ्या आवेशानं व विद्वत्ताप्रचुर भाषणानं दारूचे दुष्परिणाम श्रोत्यांना समजावून सांगितले. त्यांची भाषण करण्याची पद्धत व विषयविवेचनाची शैली हीं साऱ्या श्रोत्यांना फारच परिणामकारक वाटलीं. दारूच्या दुष्परिणामाची भाषा शिगेला पोहोचली आहे अशा वेळीं त्यांच्या उद्‌गारांनीं श्रोत्यांची आंतडीं पिळवटून निघालीं. आपल्या अस्खलित भाषणानं त्यांनीं तेव्हांच साऱ्या श्रोत्यांची अनुकूल मतप्रणालि बनवून सोडली. अनेक गिरणी कामगारांना त्यांनीं आतां दारूच्या व्यसनापासून परावृत्त करण्याचं काम चालविलं होतं. अनेक भगिनी त्यांना त्यांच्या या पवित्र कार्याबद्दल दुवा देत होत्या.

असं होत होत त्यांच्या दारूबंदीच्या कार्याची तारीफ अबकारी खात्याचे मंत्रिमहाशय यांच्या कानापावेतों गेली व नंतर लौकरच त्यांना एका भागाचे ‘ स्पेशल दारूबंदी ऑफिसर ’ नेमल्याची ऑर्डर त्यांच्या हातीं येऊन थडकली आणि त्यांच्या अभिनंदनार्थ दोन दिवसांनीं प्रो. रंगरावाकडे एक ॲटहोम देण्याचेंहि जाहीर झालें. हें सारें पाहून सुनंदेचा आनंद खरोखर गगनांत मावत नव्हता.

दौलतराव दारूबंदी ऑफिसर झाले. पण त्यांना महत्त्वाची अशी एक गोष्ट अजून करावयाची होती. ती म्हणजे, त्यांचा पूर्वीचा दारूदोस्त

सोनाजी जॉबर याची दारू कायमची सोडावयास लावणेची. त्यांना सोनाजीच्या पत्नीचे ते अपमानकारक शब्द एकाएकीं आठवले, व त्यांचें अंतःकरण चरकून निघालें. आपला तो त्या वेळचा अपमान सोनाजीच्या बायकोनं-देवकीनं- केला असं आपण मनाशीं म्हटलं. पण देवकीनं ते आपल्याला सुनावलेले बोल हा खरोखर एक इषारा होता. देवकीनं बोल-लेल्या शब्दांचा त्यांनीं मनाशीं जशाचा तसा पुनरुच्चार केला, ' हें पहा साहेब, असं समदी रात दारू पिनं अन् मग झिंगूनशान घरीं जाणं तुमच्यासारख्यांस्नीं नाहीं शोभत ते ! तुम्ही साहेब, जरा इचार करा याचा. तुमच्या नादानं ह्योबी लागला लई चळायला. म्हून सांगतें, नका येत जाऊं इथं. दया करा गरिबावर. घरीं तुम्हांस्नी बी संसार आहे. सोडा आतां ही अवदसा ! '

खरंच देवकीनं हें म्हटलं यातला एकहि शब्द वावगा नव्हता. देवकी नव्हे ती ! देवताच म्हटलं पाहिजे तिला. स्वतःच्या नवऱ्याची दारूची संवय सुटावी म्हणून तिनं मला तिच्या स्वतःच्या घरीं येण्यास मज्जाव केला. किती ही नवऱ्यावरची अढळ श्रद्धा ! आता आपण स्वतः सोनाजीकडे जाऊन त्याची दारू कायमची सोडविली पाहिजे. देवकीला त्यामुळं किती आनंद होईल ! मग ती आपण होऊन मला दुवा देईल.

अशा विचारानें ते खुर्चीवरून उठले. त्यांनीं दारूबंदीच्या प्रचारकार्याचे तक्ते हातांत घेतले व बरोबर कोणालाहि न घेतां ते सरळ सोनाजीच्या घरीं येऊन दाखल झाले.

सोनाजी घरीं नव्हता. देवकी जात्यावर धान्य दळण्याचें काम करीत होती. दौलतरावांना साहेबी पोषाखांत आलेले पहातांच ती भांबावलेल्या नजरेनं उठून उभी राहिली. तिनं खरोखर त्यांना त्या खाकी युनिफॉर्म-मुळं ओळखलंच नाहीं.

" सोनाजी कुठं गेला आहे ? " त्यांनीं विचारलं.

" गेल्या दोन दिवसांपासून पत्ता नाहीं त्यांचा ! कुठं गेल्याती कांहीं समजत नाहीं. गेले असतील दारूगुत्त्यावर, दुसरीकडं कुठं जाणार ?" देवकी

जमिनीकडं नजर लावत कसबसं म्हणाली व लागलीच तिचे डोळे अश्रूंनी भरून आले, तिचा कंठ दाटून आला आणि अगदीं याच वेळीं खालीं जमिनीवर एका लक्तरावर निजविलेला तिचा बाळ भोकाड पसरत जागा झाला. तें दृश्य पाहून दौलतरावाचें अंतःकरणहि कळवळलें.

अगदीं खरंखुरे दारूड्याच्या घराचें करुणाजनक दृश्य तिथं स्पष्टपणें दिसून येत होतें. पाचसहा हात लांबीरुंदीची भिकार खोली होती ती! जमिनीला सर्वीकडे ओलावा होता. चूलसुद्धा तीन दगड मांडूनच केलेली दिसत होती. मातीचीं दोनचार गाडगीं-मडकीं, अंथरायला फाटकी गोधडी व गोणपाटं, एक जातें, एकदोन गिलटी लोटया व ताटं असा ओंगळ संसार होता तियला. हेंच ते दारूड्याचं खरखुरं जीवन! एकुलत्या एक सोनुल्याच्या अंगांत कुडतं नव्हतं. एका फाटलेल्या फडकीच्या तुकड्यांत त्याला गुंडाळलं होतं. देवकीच्या अंगावरहि अनेक ठिगळांनीं जोडलेलं असं विटक्या रंगाचं लुगडं व तशीच अर्धीअधिक फाटलेली चोळी होती. डोकीच्या केसांना कैक दिवसात तेल न लागल्यामुळें त्याच्या बटा तिच्या चेहेऱ्याला अधिकच भेसूरता आणीत होत्या. जात्याजवळच्या फाटक्या सुपांत थोडंसं किडकं धान्य पडलेलं दिसत होतं व तेंच टळण्याचा उद्योग देवकी करीत होती.

देवकी फारच वाळली होती. नुसतीं हाडं शिल्लक राहिलीं होतीं तिच्या अंगावर. पोटाचें चिपाड झाले होतें आणि ती तिची भकास नजर! हृदय द्रवलं त्यांचं तें दृश्य पाहून.

निमित्तमात्र त्यांनीं सर्वत्र नजर टाकून म्हटलं, "देवकीबाई, मला ओळखलंत तुम्ही?"

यावर देवकी कांहींच बोलली नाहीं. ती नुसती खालीं मान घालून सलज्ज उभी राहिली.

"मी पूर्वी इथं येऊन सोनाजीला दारू पिण्याकरता अड्ड्यावर घेऊन जात असें. आठवतं तुम्हांला? तुमचे ते उद्गार..."

"व्हय्, तें वळखलं मी! त्याबद्दल माफ करा गरिबाला. राग नका ठेवूं मनामंधी!" तिनं कसंबसं म्हटलं.

" राग ? आणि तुमच्यावर ? छे ! छे ! शक्य नाहीं ते ! पण देवकीताई, आतां मी इथं आलो तो सोनाजीला दारूगुत्त्यावर घेऊन जाणेकरतां म्हणून नव्हे; तर त्याची दारू कायमची सोडण्याकरतां म्हणून. मी स्वतः तर दारू कधींपासूनच सोडली आहे व आतां दारूबंदीच्या कार्याचेंच काम मी पत्करलें आहे. आतां मी सोनाजीला हुडकून काढतो व माझ्या सोबत त्याला ठेऊन त्याची दारू कायमची सोडवितो. काळजी नको करूंस तूं देवकीताई !"

दौलतराव एवढं म्हणून तिथून पाठमोरे झाले.

" परमेश्वर तुमचं कल्याण करो ! मुलाबाळांना उदंड आयुष्य देवो किती छान आहेत ते; पण साहेब, जरा थांबा. " ती बाहेर जाऊन दौलतरावाना थांबवीत म्हणाली.

दौलतराव थांबले. चार पावलं मागें वळून ते तिच्या जवळ आले. देवकीचा चेहेरा अश्रूंनीं भरून आला होता.

" मागं मी तुम्हाम्नीं कांहीं ना कांहीं लई टाकून बोललें होते. ते समदं विसरून राग नका धरूं या तुमच्या गरीब बहिणीवर."

" नाहीं ! देवकीताई, मुळींच नाहीं ! राग आणि तुझ्यावर ? कदापि शक्य नाहीं तें. "

ते मनाशीं म्हणाले, ' परमेश्वरा, किती हे भाबडे निर्मळ हृदय! दारुड्या नवऱ्याचा फाटका संसार आनंदानं करणारी ही गृहदेवता ! खरोखर काय उपमा द्यावी या लक्ष्मीला !'

" नाहीं ! देवकीताई, तुमच्या मागच्या बोलण्याचा मला जराहि राग आलेला नाहीं. उलट त्या बोलण्याने माझं खरोखरीच हितच झालेलं आहे. तुझं तें बोलणं मला आतां अमोल किंमतीचं वाटत आहे. तुझे खरोखर त्याबद्दल मी उपकार मानतों. आतां मी सोनाजीची दारू सोडवून त्याला सन्मार्गावर आणणार असं निश्चित आश्वासन देतों. बरं, येतों मी आतां. सरळ गुत्याकडं गेलों म्हणजे लागेल त्याचा पत्ता तिथंच. " असं म्हणून ते तडक चालूं लागले.

' ईश्वर तुमचं भलें करो. घराचं गोकुळ करो. खरंच किती देव-माणूस आहे हा साहेब ! ' असं स्वतःशीं म्हणत देवकीनं डोळ्यांच्या कडा पुसल्या.

अन् याच वेळीं तरटावर बोटं चाटीत पडलेल्या तिच्या लहान्यानं भोकाड पसरलं व मग ती भानावर आली.

' अररऽऽ माझा लाडका तसाच पडलाय् बाय ' असं म्हणतच तिनं चटदिशीं त्याला हातांनीं वर उचलून घेतलं व त्याचे पटापट मुके घेतले.

* * *

सोनाजी जॉबर याची गिरणीमधील नोकरी केव्हांच गेली होती. नेहमीं कामावर उशीरा जाण्याच्या सबबीवर व एकदोन प्रसंगीं दारू पिऊन गिरणींत आला म्हणून त्याला कामावरून कायमचं कमी केलं होतं. त्याच्याजवळ होतं नव्हतं तें किडूकमिडूक विकून त्यानं आतापावेतों कशीबशी पोटाची खळगी भरली होती. आतां दोनदोन दिवस तो घराकडे ढुंकूनहि पाहिनासा झाला होता. दिवसाचा त्याचा सारा वेळ दारूच्या गुत्त्यावरच जात असे. शहरांतील सारे गुत्ते दारूबंदीच्या धोरणामुळे सरकारनें बंद केले होते. पण शहरापासून दूर असणाऱ्या एका छोटया संस्थानाच्या हद्दीत एक गुत्ता अजून चालू होता. त्याची बंद होण्याची मुदत अद्याप तीन महिने शिल्लक राहिली होती. शहरांतील कांही अट्टल दारुडे तिथं मुद्दाम आपली तल्लफ भागविण्यासाठीं जात होते. याच गुत्त्यावर सोनाजी आपल्या दोन मित्रांसह अड्डा ठोकून बसला होता.

दौलतराव गुत्त्यावर येऊन दाखल झाले. गुत्त्याची ती जागा गांवापासून जराशा लांब अंतरावर चिंचेच्या झाडांनीं नटलेल्या रम्य अशा उंच जागीं होती. गुत्त्याच्या प्रशस्त अशा मोठ्या ओट्यावर मुख्य पीप ठेऊन तेथें दररोजची विक्री करण्याचें काम चालू होतें. गुत्त्याचें अंगण मोठें प्रशस्त व वाळू वगैरे टाकून समांतर असें केलेलें होतें. तिथं पिणारे लोक टोळ्याटोळ्यांनीं बसलेले दिसत असत.

दारूविक्रीकरतां एक लठ्ठ देहाचा पारशी गृहस्थ तिथं काकजवळ बसला होता. गिऱ्हाईकांची तिथं तोबा गर्दी उडून राहिली होती. पारशी

दादाचा रुबाब मोठा शानदार होता. त्याच्या मिशांना त्यानं आकड्याचा पीळ भरला होता. चेहेरा गाजरासारखा लाल व नजर मोठी भेदक होती त्याची ! गिऱ्हाईकांची एवढी गर्दी तिथं दाटलेली होती; पण सारें काम कसे गुपचुप चालू होतें. त्याच्या नुसत्या दृष्टिक्षेपांतच गिऱ्हाईक बाटलींत पडेल तेवढी दारू घेऊन मुकाट्यानं तेथून चालायला लागे. जरा कुणाची खट् म्हणण्याची प्राज्ञा नव्हती. तो पारशी शेट भराभर पैसे घेई व मोठ्या झट-क्यानं अति कौशल्यानंच दारूचा चकचकीत काक क्षणमात्र उलटसुलट करून गिऱ्हाईकाच्या हातीं बाटली देई व मग गिऱ्हाईकहि मुकाट्यानं बाटली हातांत घेऊन तिथून निघून जाई. केव्हां केव्हां पारशीदादा गिऱ्हा-ईकांच्या झुंडीकडं शहेनशहाच्या रुबाबात नजर फिरवून पाही. त्या नजरेत जणूं असाच आदेश होता, ' चूपचाप चलेजाव ! '

दारूचा वास तिथं सर्वत्र दरवळून राहिला होता. बाजूला भर्जी, शेव-चिवडा यांची पण विक्री जोरांत चालली होती. दौलतराव तिथं जाऊन अंमळ थाबले. साऱ्या बाजूंना त्यांनीं जरासं निरखून पाहिलं. जो तो दारू पिऊन तर्रर झाला होता. साहेबी पोषाख केलेला कोणी ऑफिसर गुत्याच्या परिसरांत आला आहे हे शेटजीच्या कानांवर जातांच त्यांनीं उठून दौलतरावांना मोठ्या अदबीनं ' साहेबजी ' केलं व वर आदरानं बोलावून घेतलं. त्याच्या आदराचा क्षणमात्र स्वीकार करून दौलतराव तेथून त्वरित परतले. त्यांची दृष्टि कांहींतरी हुडकीत होती. त्यांना जी व्यक्ती हवी होती ती तिथं दिसत नव्हती. त्या व्यक्तीला पहाण्यांत, हुडकून काढण्यांत त्यांनीं आपल्या नजरेला बराच ताण दिला. पण नाहींच दिसली ती !

मग ते क्षणमात्र मनाशीं विचार करून गांवच्या दिशेनं चालू लागले. कांहीं अंतर चालून गेल्यावर सडकेच्या डाव्या बाजूला त्यांना कोणीतरी एक इसम अतिशय दारू प्याल्या स्थितींत बेशुद्ध होऊन पडलेला आहे असं दृश्य दिसलं. ' सोनाजी तर नसेल हा ! शक्य आहे तें ! ' मनाशीं त्यांनीं म्हटलं.

मग ते त्या प्रेतवत् पडलेल्या व्यक्तीजवळ जाऊन दाखल झाले. तों

काय आश्चर्य ?

सोनाजीच होता तो ! अंगावर धड कपडा नाहीं, नेसलेले फाटके धोतर सुटलेले, डोक्यावर जखम झालेली, अशा स्थितींत वर आकाशाकडे तोंडाचा ' आ ' वासून तो पडून राहिला होता. जवळच्या उकिरड्यांची घाण सर्वत्र दुर्गंधि आणीत होती. ते दृश्य पाहून दौलतरावाना खरोखर चीड आली. सोनाजीबद्दल त्यांच्या मनात घृणा उत्पन्न झाली. त्यांनीं स्वतःशीं म्हटलं, ' काय हे दारुड्याचे जीवन ! किती ही माणसाची अधो-गति ! खरंच दारूबंदी यशस्वी व्हायलाच पाहिजे ! '

त्यानीं खालीं बसून सोनाजीच्या तोंडावरून आपला हात फिरविला. सारें शरीर थंड पडले होतें त्याचें ! डोळेहि खोल गेलेले होते. शरीरांत रक्तच मुळीं शिल्लक राहिलं नव्हतं. हाडाचा सापळा झाला होता तो ! दौलतरावाच्या हाताचा मस्तकाला स्पर्श होतांच त्यानं आपले किलकिले डोळे पडल्या पडल्याच उघडले. अजूनहि त्याच्या तोंडाला घाण येतच होती. चांगला शुद्धीवर नव्हताच तो !

" कोन म्हाद्या का ? अरेरे साल्या ऽऽ...मला सोडून...पन याद ठेव बेटाजी, म्हणावं, हा बी नांवाचा सोन्या आहे. तुझ्या सात पितराचा उद्धार करीन...उद्धाऽ ऽ ऽ र " तो उठून बसण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

" सोनाजी, शुद्धीवर ये. असं भलतंसलतं बरळूं नकोस ! नीट निरखून पहा. मी कोण आहे बरं ? "

" अरे ऽ तू तुं ऽ...हरामखोर दौलत्या...अर ऽऽ चल ! हो दूर, जा इथून. तें काळं तोंड नको दाखवूं मला र ऽ "

" सोनाजी, शुद्धीवर ये ! शांत रहा ! मी जरा पाण्याचा शोध करतों तोंवर सावकाश पडून रहा. " दौलतराव उभे राहात म्हणाले.

" अरे जा बे, शहाजोग...याद नाहीं का ती. इसरला व्हय् ? पन मी नाहीं इसरायचा बरं. चोर तो चोर आणि ..."

नंतर दौलतरावांनीं कांहीं वेळ मध्यें जाऊं दिला. नशा उतरल्यावर सोनाजी उठून बसला. त्याला स्वतःबद्दल स्वतःचाच फार तिरस्कार

वाटला. मसणवटीकडे जाणाऱ्या रस्त्यावर उकिरड्यांच्या घाणेरड्या जागेवर आपण दारूच्या धुंदींत पडून राहिलो आणि आपले दारुडे मित्र इथं नाहींत, ते आपल्याला सोडून निघून गेले, या विचारांनी त्याचा मनस्ताप अधिकच वाढला. पण जवळ दौलतराव आलेले आणि तेहि अप-टु-डेट साहिबी पोशाखात! हे काय गौडबंगाल आहे हे त्याचे त्याला समजेना. दौलतरावहि अनिमिष नेत्रानीं त्याच्या भकास चेहेऱ्याकडे पहात राहिले.

"कोण दौलतराव! आणि इकडं या वेळी इथं कसा?" त्यानं चाचरत प्रश्न केला.

"सांगतों सर्व सावकाश! पण सोनाजी, तूं आधी इथून उठ पाहूं! हें पाणी आणलं आहे यानं तोंड धू म्हणजे जरा बरं वाटेल. मग आपण गांवांत जाऊन तुझ्या जेवणाची कांहीं तरी सोय लावूं." दौलतराव त्याला उठवीत म्हणाले.

"पण दौलतराव, खरंच सांगतो, माझ्याकडून नाहींच उठवलं जात. डोळ्यापुढं काजवे चमकायला लागलेत रे! आणि भकदेखील फारच लागली आहे. खरंच, तूं इथं मला एक परमेश्वरच भेटलास! मित्रा, कांहीं तरी खाण्याची सोय करशील तर फार उपकार होतील तुझे."

"तें खरं; पण येथून तूं हळूहळू माझा हात धरून चालायची तयारी केली पाहिजेस!"

"दौलतराव, खरंच हो नाहींच उठवत मला. माझीं सारीं गात्रं अगदीं शिथिल पडलीं आहेत. एखादा भाड्याचा तांगा नाहीं का मिळणार?"

"पहातों तशी खटपट करून. बैस अंमळ इथंच!"

असें म्हणून दौलतराव गांवच्या दिशेनं झपझप पावलें टाकीत मार्ग आक्रमूं लागले. थोडीशी चौकशी करतांच त्यांना एक तांगा सांपडला व भाडें ठरवून त्यांनीं सोनाजीला गांवांत आणलं. एका खाणावळीत त्यांनीं त्याची जेवणाची सोय केली. पोटांत अन्नाची भर झाल्यानं सोनाजीला बरीच हुषारी वाटूं लागली. दौलतरावांनीं मग त्याला स्नान करायला लावलं. नवीन सदरा व चड्डी खरेदी करून त्याला पेहेरायला दिली. एवढं

सर्व झाल्यावर सोनाजीला फार हुषारी वाटूं लागली. मग आणखी थोडा वेळ विश्रांति घेतल्यावर उभयतांनीं चहा घेतला व मग ते बोलत बोलत आपल्या घराकडे जायला निघाले. आतां सोनाजीचा मेंदू बराच शांत झाला होता. आतां उपदेश करायची ही संधि बरी आहे असं पाहून दौलतरावांनी संभाषणास सुरवात केली.

" सोनाजी, आतां या क्षणापासून तूं अशी प्रतिज्ञा घे कीं, ' मी यापुढें दारूच्या एका थेंबालाहि शिवणार नाहीं. ' मी स्वतः तशी प्रतिज्ञा पूर्वीच घेतली आहे व आतां सरकारच्या दारूबंदी कार्याचा ऑफिसर झालो आहें. केवळ तुला हुडकून आणावें व सदुपदेशाच्या दोन गोष्टी सांगाव्यात या हेतूनेंच मी तुझा तपास करीत इथं आलो आहे. " दौलतराव म्हणाले.

" एवढी घडामोड झाली तरी त्याची मला गंधवार्ताहि नाहीं हें कसें ?"

" कळणार कोठून तुला हे ? तूं गेल्या पंधरा दिवसांपासून एकसारखा पिण्याचा सपाटा चालविला आहेस ना ? आतां माझी तुला कळकळीची हीच विनंति आहे की, यापुढें सन्मार्गानं वाग ! दारूचं नांव सुद्धां घेऊं नकोस ! मी जसं माझं चरित्रच बदलून टाकलं आहे तसं तूं देखील तुझं चरित्र आजपासून बदलून टाक. "

" पण दौलतराव, माझ्या घरची काय हालत असेल ? खरंच हो, देवकी ही एक देवता आहे. तिला मी किती छळलं ! मुलाकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलं. तिचं पवित्र मंगळसूत्र सुद्धां मी दांडगाईनं तिच्याकडून काढून घेतलं व माझी दारूची तल्लफ ते विकून आलेल्या पैशावर भागविली. शरम वाटते त्या गोष्टीची आतां मला. देवकीची कोणत्या शब्दांनीं माफी मागूं मी ? हें काळें तोंड तिला कसें दाखवूं मी आतां ? "

" सोनाजी, इतकें भिण्याचें कांहींच कारण नाहीं तुला. मी इकडं आलों त्या वेळींच देवकीला भेटून आलों आहें. एका शब्दानेंहि ती तुला दोष देणार नाहीं याबद्दल माझी पुरेपूर खात्री झाली आहे. "

" पण दौलतराव, हें तोंड तिला दाखविण्याची माझी मलाच मनाशीं शरम वाटत आहे. देवकीसारख्या सच्छील स्त्रीचा मी छळ केला, तिला फार फार त्रास दिला. आतां कसं जाऊं घरीं ? "

" सोनाजी, खरंच सांगतों, देवकीच्या मनांत तुझ्याविषयीं जरासुद्धां किल्मीष नाहीं. तुला केव्हां एकदां डोळ्यांनीं पाहीन असें तिला झालें आहे. तुला नजर भरून पहाणेकरतां तिचे डोळे आसुसले आहेत. मात्र तुला माझें एक कळकळीचें सांगणें आहे. यापुढें तूं केव्हांहि दारूला शिवतां उपयोगी नाहीं. सोनाजी, विचार कर. या दारूपायीं तुझी चांगल्या मोठ्या पगाराची जॉबरची नोकरी गेली. घरांत तुझा सोन्या-सारखा मुलगा तसाच तरटावर लोळत पडला आहे; त्याच्याकरतां शीपभर दूध विकत घ्यायला देवकीजवळ कपर्दीकहि शिल्लक नाहीं. स्वतः देवकी तीन तीन चार चार दिवस उपास काढते आहे. असं जरी आहे तरी तिचे डोळे नेहमीं तुझ्याच वाटेकडे लागलेले असतात. तिच्या दृष्टींतील कारुण्य अजूनहि माझ्या नजरेसमोरून हालत नाहीं. खरंच ती 'गृहलक्ष्मी' आहे... 'गृहदेवता आहे.' सोड आतां या दारूचा नाद व कर तिला कायमचें सुखी. करशील ना हें ?" दौलतराव म्हणाले.

आपल्या या म्हणण्याचा सोनाजीच्या मनावर किती परिणाम झाला तें त्यांनीं त्याच्या चर्येवर निरखून पाहिलं. सोनाजी एखाद्या अपराध्यासारखा निमूटपणें खालीं मान घालून चालत होता. गांवची हद्द संपून आतां मुंबईच्या विस्तीर्ण परिसरांत ते दोघे बोलत बोलत येऊन पोहोंचले होते. सोनाजीला खरोखरच पश्चात्ताप झाला होता. पण आतां नोकरी गेलेली; पोटाची खळगी कशी भरणार ? साऱ्या विवंचना त्याला भेडसावूं लागल्या. जरा वेळ कोणी कांहींच बोललं नाहीं. मुकाट्यानं ते दोन्ही मार्ग आक्रमीत होते. जरा वेळानं सोनाजी म्हणाला, "दौलतराव, आतां मी काय उद्योग करूं ? पोटाची विवंचना मला एकसारखी भेडसावत आहे."

" हें पहा सोनाजी, आधीं तूं प्रतिज्ञा घे कीं, यापुढें मी दारूच्या एका थेंबालाहि शिवणार नाहीं म्हणून; मग पुढची सर्व व्यवस्था मी करतों."

" होय ! कबूल ! त्या सर्वसाक्षी सूर्यनारायणाला साक्ष ठेवून मी तुझ्यासमोर अशी प्रतिज्ञा करतों कीं, यापुढं मी दारूच्या एका थेंबालाहि आजन्म शिवणार नाहीं. यापुढं सन्मार्गानें वागून देवकीला

आनंदांत ठेवीन...बस्, ठरलं आजपासून. पुन्हा या दारूचं-या राक्षसीचं-नांव घेणं नको."

"अगदीं खरं ना हें सोनाजी ? अगदीं मनापासून ना ? "

"होय ! अगदीं मनापासून प्रतिज्ञा घेतली आहे मी ! " तो निश्चयानं म्हणाला.

नंतर ते दोन्ही सोनाजीच्या घरी येऊन दाखल झाले. त्यांना पाहून देवकीला फार फार आनंद झाला. तिने किलकिल्या डोळ्यांनीं त्यांना पाहून घेतलं. दाराजवळ तिनं त्यांना बसायला गोणपाट अंथरून दिलं. त्यावर स्वतः दौलतराव कांहीं वेळ बसले. सोनाजी देखील त्यांच्याजवळ खाली मान घालून बसला. देवकीनं तेवढ्यांत बाळाला आणून सोनाजीच्या पुढ्यांत ठेवलं आणि तो लबाडहि लागला खेळायला ! जणू त्यालाहि त्या क्षणीं आनंद झाला होता. मग खिशातून पांच पांचच्या दोन नोटा काढून त्या सोनाजीच्या हातीं देत दौलतराव म्हणाले, "सोनाजी, उठ आतां. वेळ नको करूंस ! घे हें व बाजारांतून जरूर ते जिन्नस आणून चालू वेळ भागव ! आजचा सारा दिवस विश्रांति घे व मग उद्यांला माझ्याकडे ये. नंतर आपण बरोबर दारूबंदीच्या करमणूक केंद्रावर जाऊं. येतों मी आतां ! "

असें म्हणून दौलतराव तिथून जायला उठले. ते निघून गेल्यावर कितीतरी वेळ त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडं ते दोन्ही पहात राहिले.

———

# प्रकरण ८ वें



सोनाजीनं नंतर बाजारांत जाऊन जरूर ते जिन्नस खरेदी करून आणले. घरांत तिखटमीठ सुद्धां नव्हतं. लागणारे सारेच जिन्नस त्यानं खरेदी करून आणले. नंतर सायंकाळीं देवकीनं ज्वारीची भाकरी व पातळ पिठलें असा जेवणाचा बेत केला. गेल्या तीनचार दिवसापासून सोनाजीला चांगलं जेवण मिळालं नव्हतं. कशींतरी घाणेरडी भजीं व शेवचिवडा हेंच त्याचें अन्न बनून गेलें होतें. कारण सारा दिवसच दारूंत जावयाचा !

देवकी स्वयंपाक करीत असतां तो वारंवार चोरट्या नजरेनं कृतज्ञ-तेच्या भावनेनं तिच्याकडं पहात होता. बाळहि त्याच्याजवळ आनंदानं खेळत होता. लहानशी खोली; पण ती आनंदी वातावरणानं त्या वेळेपुरती तरी बहरून निघाली.

मग तो ताटावर जाऊन बसला. गिलटी ताट किती स्वच्छ घासलें होतं. ज्वारीच्या गरमागरम भाकरीच्या चतकोरांची काळजीपूर्वक ठेवलेली चवड, वाफा निघत आहेत असं पातळ बेसन व बाजूला ठेवलेलं बारीक मीठ ! नुसत्या वासानंच त्याची अर्धीआधिक भूक तृप्त झाली. तो ताटावर बसला; पण त्याच्यानं घास घेववला गेला नाहीं. भडभडून आलं त्याला ! आपल्या सद्र्याच्या बाहींनं त्यान आपले आसू पुसण्याचा प्रयत्न केला. तें पाहून देवकी म्हणाली,

" हें काय, रडत्यात कां म्हून ? "

" देवकी, खरंच मी मनुष्य नाहीं, पशू आहें. तुझा किती छळ केला मी ! "

" छट् ! हें काय बोलायचं असं वेडाविद्र ! आतां नाहीं प्याला दारू मंजे सारं बी ठीक होईल ! अगदीं पहिल्यावानी ! कुठं बी नोकरी लागल. नका करूं त्याचा इचार. जेवा शांतीनं ! "

" खरंच देवकी, तूं सामान्य स्त्री नसून खरोखरीची देवताच आहेस. मला वाटतं माझं थोबाड पायांतल्या वहाणांनीं फोडून घ्यावं. किती नीच

मी ! अधम...दुष्ट ! तुझं मंगळसूत्र सुद्धां मी विकून फस्त केलं आणि अशा निर्दय मनुष्याला तूं नवरा म्हणून आनंदानं घरांत घेतेस, जेवूं वाढतेस ! धन्य आहे तुझी ! फार फार शरम वाटतेय् मला."

"हें काय लावलंय् ? भाकर थंड व्हायला लागली ती. जेवा चांगलं. मन शांत ठेवा ! आतां नाहीं पिनार ना दारू ? मग झालं तर ! समदं कसं सोन्यासारखं व्हईल बघा. घ्या त्यो घास !"

नंतर सोनाजीनं पोटभर जेवण केलं. जेवण त्याला अमृतासारखें मिष्ट लागलें हें सांगावयाला नकोच ! नंतर त्यानं बाळाला जवळ घेऊन खेळ-वलं. खरकटं वगैरे काढून देवकीनंहि स्वतः जेवण केलं. रात्रीं त्या खोलींत लहानशी चिमणी प्रकाश देऊं लागली. देवकीनं बाळाला दोरीच्या झोक्यांत निजवलं होतं. पण तो लबाड तिथं रहात नव्हता. सारखा बाबा, बाबा म्हणून भेकाड पसरवीत होता.

मग देवकीनं बऱ्याच प्रयासानं त्याला गाणी म्हणून निजवलं. त्याला झोप आली. ती झोका हलवीत अंगाई गीत गात होती.

आणि सोनाजी चोरट्या नजरेनं ते गोड दृश्य पहात होता. त्या अननुभूत आनंदानं त्याचं हृदय कांठोकांठ भरून आलं.

* * *

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं सोनाजी रहात होता त्या भागाकडील गिरणीकामगाराच्या वस्तीत गांधी चौकांत साऱ्या कामगारांची तुफान गर्दी उसळली होती. कारण तिथं दारूबंदीचे ऑफिसर मि. अनंतराव डोंगरे यांचें 'दारूबंदी' या विषयावर जाहीर व्याख्यान होणार होतें. दारूबंदी ऑफिसर मि. डोंगरे यांनीं आतांपर्यंत तिकडच्या सर्व भागांतून यशस्वी रीत्या प्रचारकार्य केलं होतं. त्यांचे वक्तृत्व असामान्य कोटींतलें होतें. त्यांनीं दारूच्या दुष्परिणामांवर व्याख्यान द्यायला सुरवात केली म्हणजे सारे श्रोते एका अत्युत्कट भावनेनं अचल रहात. हजारों गिरणीकामगारांपुढं जेव्हां ते दारूच्या भस्मासुरी लीला वर्णन करून सांगत, तेव्हां साऱ्यांना दारूबद्दल संताप येई. इतकें त्यांचें प्रतिपादन श्रोत्यांच्या मनाची पकड घेणारें असे. व्याख्यानानंतर दारुड्या नवऱ्यांच्या अनेक बायका त्यांना त्यांच्या करीतां

असलेल्या कार्याबद्दल दुवा देत असत. सुरवातीला दारूबंदीवर रचलेले पोवाडे व नंतर एकअंकी नाटिकेचा प्रयोगहि होत असे. केव्हां केव्हां मॅजिक लॅंटर्नच्या सहाय्यानें दारूच्या दुष्परिणामाचीं करुणाजनक चित्रेंहि कामकऱ्यांना दाखविलीं जात. हा सारा प्रोग्राम तत्कालिक प्रसंगाला धरून पार पाडला जाई. नंतर श्री. अनंतराव डोंगरे हे जेव्हां दारूबंदीवर भाषण करायला उभे रहात, तेव्हां टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होई व नंतर ते प्रेक्षकांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारें, त्यांचें हृदय हलविणारें दारुड्यांच्या हृदयाला पीळ पाडणारें असे विवेचनात्मक भाषण करीत व मग ' दारू पीना हराम है ! ' अशा आरोळ्यांनीं सारें वातावरण दुमदुमून उठे.

कांहीं प्रसंगीं मि. डोंगरे यांचें प्रचारकार्य सुशिक्षित म्हणवल्या जाणाऱ्या उच्च वर्गांतहि होत असे. मग अशा वेळीं त्यांच्या भाषणाचा परिणाम एका निराळ्याच रीतीनं सुशिक्षित प्रेक्षकांच्या अंतःकरणावर होत असे. ते नेहमीं म्हणत, ' दारू पिण्याची प्रवृत्ति ही अशिक्षित अशा शेतकरी-कामकरी वर्गांतच आहे असें नाहीं. तर ती चांगल्या सुशिक्षित म्हटल्या जाणाऱ्या हजारों सुबुद्ध व पदवीधर लोकांतहि विशेष प्रमाणांत चालूं आहे. तेव्हां दारूची पाळेंमुळेंच खणून काढावयाचीं म्हटलें तर, अशिक्षित अशा शेतकरी—कामकरी वर्गाइतकाच या अशा चोरून दारू पिणाऱ्या समंजस लोकांच्याहि अंतःकरणांत बदल घडून यावयास पाहिजे. ' म्हणून ते त्या दृष्टीनं अशा वर्गाच्या सुशिक्षित वर्गापुढं मोठ्या मार्मिक रीतीनं दारूच्या दुष्परिणामावर भाषण करीत.

आज जाहीर सभेच्या कार्यक्रमानंतर अबकारी खात्याचे मंत्रिमहाशय स्वहस्तें दारूच्या बनविलेल्या भुताला अग्निसंस्कार करणार होते व म्हणून तिथं लोकसमुदाय मोठ्या औत्सुक्यानं फुलून निघाला होता. कामगार भगिनींच्या संख्येला तर गणतीच नव्हती. त्या समुदायांतच दौलतराव व रंगराव यांच्या पत्नी सौ. सुनंदा व रमाबाई या आधींपासूनच येऊन बसल्या होत्या. दारूबंदीच्या एखाद्या सभेला आपणाला न्या, असा आग्रह सुनंदेचा कधींपासून दौलतरावांच्या मागें होताच; म्हणून आज मुद्दाम त्यांनीं तिला सभेला आणलं होतं.

बरोबर सहा वाजतां मि. अनंतराव डोंगरे, दौलतराव पाटील आणि स्थानिक कार्यकर्ते श्री. गोविंदराव, श्री. गायतोंडे, श्री. केरूअण्णा वगैरे मंडळी अबकारी खात्याचे मंत्रिमहाशय यांना बरोबर घेऊन सभास्थानीं येऊन हजर झाली व बँडच्या सुस्वर स्वरांनी त्यांचं स्वयंसेवकांनीं स्वागत केलं. दूरवरचे सारे प्रेक्षक उठून उभे राहिले व ' महात्मा गांधीकी जय ', ' वंदे मातरम् ' या आवाजानं वातावरण दुमदुमून निघालं.

मुलींच्या ईशस्तवनपर गाण्यानें सभेला सुरवात झाली. स्थानिक कार्यकर्ते श्री. गोविंदराव यांनीं प्रास्ताविक निवेदन म्हणून आजच्या प्रसंगाचें गाभीर्य दोन शब्दांत वर्णन करून सांगितलें व दारूबंदी ऑफिसर श्री.अनंतराव डोंगरे यांना भाषण करण्याची विनंति केली. ते बोलायला उभे राहिल्यावर वातावरण अतिशय शांत झालं. ते म्हणाले,

" उपस्थित बंधूंनो ! व भगिनींनो, तुम्हां सर्वांना माहीत आहेच कीं, आतां आपला भारत देश स्वतंत्र झाला आहे. परक्या सरकारचे राज्य जाऊन येथें आतां आपलेंच कॉंग्रेस सरकार या विशाल भारताचा राज्यकारभार करूं लागलें आहे. परकीयांनीं सत्ता सोडली; परंतु ती सोडतांना त्यांनीं राज्यकारभाराच्या मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न करून ठेवल्या. शिवाय अनेक वर्षांच्या गुलामगिरीमुळें आपली साऱ्याची वृत्तिहि गुलामी आणि विवेकशून्य अशी बनली आहे. अनेक व्यसने आपल्या समाजांत राजरोसपणें ठाण मांडून बसलेली आहेत. परकी सत्ता असतांना दारूबंदी करण्याचा नुसता ओझरता विचारहि त्याच्या मनाला कधीं शिवला नाहीं. उलट दारूच्या उत्पन्नाचा सारा खर्च शिक्षणासारख्या पवित्र कार्यांत खर्च करण्याची सांगड मोठ्या कुशलतेनें घालून त्यांनीं त्या वेळच्या दारूबंदी करा म्हणून म्हणणाऱ्या पुढाऱ्यांचीं तोंडेंच बंद करून टाकलीं होतीं. दारूच्या उत्पन्नाचा आकडा सालोसाल वाढतीवर होता. एवढ्या अफाट उत्पन्नाचें खातें एकदम किंवा पायरीपायरीनें बंद करणें म्हणजे शिक्षणच बंद करण्यासारखें अडवणुकीचें केलें होतें त्यांनीं !

"वार्षिक बजेटाच्या शब्दावडंबरांत लाख व कोटींच्या आकड्यांनीं सारे सभासद भांबावून जात. त्यावेळचा अर्थमंत्रि हा ब्रिटिश सत्तेंत चांगला मुरलेला

व त्यांच्याच नीतीची ' री ' ओढणारा असलेनें दारूबंदी केली म्हणजे राज्यकारभार चालणेंच कसें दुस्तर होणार आहे याचें भडक चित्र तो सभागृहापुढें मांडून मोकळा होई व मग दारूबंदी करा म्हणणाऱ्या एखाददुसऱ्या सभासदाचें तोंडहि आपोआपच बंद होई. बहुतेक सारे सभासदहि त्याच्याच राखीव कळपांतले असलेने प्रस्तुतच्या विषयाला ब्रिटिश सत्ता इथं असेपावेतो जोरानें तोंड फुटलें नव्हतें.

" मध्यंतरीं १९३७ सालीं पहिलें कॉंग्रेस मंत्रिमंडळ स्थानापन्न झालें व त्यांनी अधिकारस्वीकार करतांच पहिल्याप्रथम दारूबंदी या विषयाला हात लावला. खरोखर दारूदुकाने बंद करून लाखों रुपयांचा खर्च दुसरीकडून भरून काढणें ही सोपी गोष्ट नाहीं. पण आपल्या खंबीर कॉंग्रेस मंत्रिमंडळानें या अडचणींतून मार्ग काढून दारूबंदी यशस्वी करण्याचा चंग बाधला आहे आणि त्याप्रमाणें कार्य बरेंच यशस्वीहि झालें आहे. आपल्या कॉंग्रेस सरकारचा पुरेपूर विश्वास आहे कीं, या मदिरा राक्षसीचें, या सैतानी भूताचे, या हालाहल विषाचें आपल्या देशांतून कायमचें उच्चाटन होईल. ( टाळ्या )

" बंधूंनो, दारूबंदीकरतां सरकार जे जे काहीं उपाय योजावयाचे ते सारे आरथेनं योजीत आहेच. परंतु हें कार्यच असें मोठें आहे कीं, तुम्ही साऱ्यांनीं मनोभावे सहकार्य केल्याशिवाय ते यशस्वी होऊंच शकत नाहीं. तुम्ही विचार करा, दारू पिण्यापासून कोणाला तरी आनंद वाटतो का ! दारू ही अशी चीज आहे काय कीं तिच्याशिवाय आपले व्यवहार अडून बसावेत ? दररोजच्या अन्न, कपडा व निवाऱ्याची जागा या प्राथमिक गरजा जिथं भागण्याची मारामार, तिथं या दारूची नसती जरूर तरी कां वाटावी ? आपण बासुंदी पितों तेव्हां तोंड गोड होतें. एखाद्या उमद्या व लज्जतदार सरबताचा ग्लास ओंठाला लावतों तेव्हां आपलें तोंड गोड होतें व त्यामुळें एका अननुभूत आनंदाचा आस्वाद आपली जिव्हा घेत असते. अशा प्रकारचा आनंद दारूचा प्याला तोंडाशीं नेल्यावर होतो काय ? मुळींच नाहीं ! उलट तोंड वेडेवांकडें करूनच पिणारे ती पितात. म्हणजे नैसर्गिक रीत्याच मानव प्राण्याला दारू ही बिनजरूरीची अशी चीज आहे हें

आपोआप सिद्ध होतें.

"प्रत्येक दारू पिणाऱ्याला हें कळतें कीं, आपण दारू पितों हें फार वाईट करतों; दारू पिऊन कोणाचें बरें झालें आहे तर आपलें होणार आहे ? पण हें सर्व समजत असूनहि तो ती घेतोच ! याचें कारण हेंच कीं, बाह्य वातावरण त्याला भुलवीत असतें.

"तो दारूगुत्ता ! तें बेहोष होणं ! ते झिंगलेल्यांचे देखावे! हीं सारीं दृश्यें त्याला पुन्हा पुन्हा मोहवीत असतात. याला इलाज 'दारूचे गुत्तेच बंद करणें', हा कॉंग्रेस सरकारनं अमलांत आणला आहे, व तो फारच परिणामकारक ठरला आहे. जी वस्तू डोळ्यांनीं दिसतांच ती घेण्याचा मोह माणसांना आवरला जात नाहीं, ती वस्तूच डोळ्यापुढें दिसूं नये असा बंदोबस्त सरकारनें करून टाकला आहे व तो बहुतांशीं यशस्वीहि झाला आहे. दारूचीं सर्वांकडचीं दुकानें बंद केल्यानें जवळजवळ ऐंशीं टक्के कार्य यशस्वी झालें असें म्हणायला हरकत नाहीं. पण दारूबंदीचें हें कार्यक्षेत्रच एवढें विस्तृत आहे कीं, तें जनतेच्या पूर्ण सहकार्याशिवाय सर्वस्वीं परिपूर्ण होऊं शकणें बरेंचसें कठीण आहे. तेव्हां माझी सर्वांना प्रेमाची विनंति आहे कीं, तुम्ही या कार्यांत सरकारच्या योजनेशीं सहमत व्हा ! 'दारू' या शब्दाचा नुसता उच्चारहि करूं नका. चोरून दारू आणणारे व तिचा व्यापार करणारे यांची वर्दी सरकारला द्या. दारूबंदीचे वैरी असलेले कांहीं लोक समाजांत उजळ माथ्यानं वावरतात. त्यांना ओळखून त्यांच्या कारवाईला केव्हांहि बळी पडूं नका. आतां नव्या जमान्यांत, नव्या आंदोलनांत, देशाच्या नव्या मनूंत या जहरी विषाला केव्हांहि वर डोकें काढूं देऊं नका (टाळ्या). लक्षांत ठेवा, सरकारच्या दारूबंदीच्या धोरणाशीं सहमत आहोत असें बाह्यात्कारीं दाखविणारे अनेक प्रकारचे लोक दारूबंदीचे वैरी आहेत. त्यांच्याबद्दलची माहिती मी थोडक्यांत सांगतों ती लक्षांत ठेवा.

"दारूला चोरटे आश्रयदाते फार आहेत. जेव्हां दारूबंदीबद्दल एखाद्या ठिकाणीं जाहीर व्याख्यान चाललेलें असतें तेव्हां त्या ठिकाणीं हे चोरटे दारूबाज उजळ माथ्यानं येऊन हजर होतात आणि व्याख्यात्याच्या भाषणांत दारूची निंदा शिगेला पोहोचली असतांना इतरांबरोबर हेहि टाळ्या

वाजवितात. मदिरा राक्षसीनं तिच्या शत्रूंच्या पक्षांत रवाना केलेले हे पंचमस्तंभी आहेत असें म्हटलें तरी चालेल. जाहीर व्याख्यानाचा कार्यक्रम संपला म्हणजे हे दिवाभीत हळूच पुनश्च मदिरादेवीच्या मंडपांत जातात. व यथेच्छ झोकून दारूचें गुणगान करीत घरीं रवाना होतात. दारूबंदीच्या चळवळीचे जर कोणी खरे शत्रू असतील तर हे होत ! त्यांची ही दुटप्पी वागणूक समाजांतल्या बहुतेक लोकांना माहीतहि असते व म्हणून अशा प्रकारच्या सभेला जेव्हां हे समाजकंटक जातीनं हजर रहातात व तोंड वेडें-वांकडें करतात तेव्हां सारे लोक त्यांच्याकडे चोरून पहात असतात. परंतु ज्या वेळीं हे लोक दारूबंदीच्या सभेला हजर असतात, त्या वेळेपुरते ते दारू प्यालेले नसतात आणि म्हणूनच अशा सभांना जावयास आपणांस पूर्ण अधिकार आहे असे त्यांचें ठाम मत असतें.

" व्याख्यानाला कांहीं व्यक्ती अशा हजर असतात कीं, ज्यांची गणना व्यसनी या सदरांत करतां येणार नाहीं; पण ते अधून मधून दारू घेऊन आपल्या जिवाची करमणूक करीत असतात. ते मनांत असें समजतात कीं आपण एकाद दुसऱ्या वेळीं पिणारे; आपणाला या दारूबंदीच्या उपदेशाची कांहीं गरज नाहीं, आणि दारुड्यांच्या यादींत आपलें नांवहि बसत नाहीं. अशा प्रकारचे लोकसुद्धां दारूबंदीचे वैरीच समजण्यास हरकत नाहीं. याशिवाय दारूला चोरट्या रीतीनं आश्रय देणारा एक सुशिक्षित वर्ग समाजांत आहे. त्याचें दारू पिणे फार निराळ्या तऱ्हेचें असतें. सर्वसाधारण लोकांप्रमाणें ते गुत्यावर कधीं जाणार नाहींत किंवा गुत्यावरची दारूहि घरीं मागविणार नाहींत. ते म्हणतात आमची दारू थेट विलायतेमधून बनून आलेली आहे. तीमध्यें इकडच्या कंट्री किंवा बेवड्यासारखे झिंगण्याचे व अंमल येण्याचे गुणधर्म नाहींत. शिवाय $\frac{3}{4}$ सोड्यांत तिला $\frac{1}{4}$ मिक्स केल्यानें ती कितीहि घेतली तरी अंमल येऊंच शकत नाहीं. उगाच आपली गुलाबी झुळूक यावी तशी मनाला प्रसन्नता आणते एवढेंच ! म्हणजे आमचें हें करणें प्रतिष्ठित रीत्या मान्य असेंच आहे व ही गोष्ट सरकारच्या दारूबंदीच्या चौकटींत बसत नाहीं असा त्यांचा त्यांच्या मनाशीं समज झालेला असतो. लक्षांत ठेवा, हे लोकहि

दारूबंदीचे वैरीच आहेत. अशा प्रकारच्या लोकांपासून प्रचारकांनीं व जनतेनें सावध असलें पाहिजे. असले समाजकंटक लोक आपल्या दारूबंदीच्या कार्याला केव्हा दगा देतील याचा नेम नाहीं. आणखी निरनिराळ्या रीतींनीं दारूची तरफदारी करणारे लोक समाजात आढळतात. कांहीं म्हणतात, सारा दिवसभर श्रम करणाऱ्यांना दारूचा एखाद दुसरा प्याला रात्रीच्या वेळीं अवश्य पाहिजेच असतो. कांहीं म्हणतात, दारू प्याल्याने प्रकृति सुधारते, ताकद वाढते. खालच्या वर्गाच्या श्रमजीवी लोकांकडूनहि असेच उत्तर मिळतें. दारूने एकदम हुषारी येते, थकवा नाहींसा होतो व एक प्रकारची मस्त मजा अनुभवायला मिळते. कांहीं खुशालचेंडू लोक-ज्यांच्या मागें प्रपंचाची फारशी दगदग नसते, जे बापजाद्यानीं कमावून मागें ठेवलेल्या अफाट इस्टेटीवर मौजा मारतात-त्यांचे म्हणणें असतें कीं, दारूनें वेळ जातो, सुखाची लज्जत वाढते; मद्याच्या सूक्ष्म धुंदींत मन सोडून दिलें म्हणजे न जाणारा कंटाळवाणा वेळ सहज निघून जातो, 'टाईम पास' होतो!

" हे अशा प्रकारचे सारे लोक दारूबंदीचे वैरी आहेत, हें लक्षांत ठेवा. ते निरनिराळ्या तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन चारचौघांत दारूची तरफदारी करीत असतात. तेव्हा अशा लोकांच्या सांगण्याला महत्त्व देऊं नका हीच माझी सर्वांना विनंति आहे आणि अशा प्रकारच्या लोकांनाहि विनंति आहे की, ' बाबांनो, आतां तुमचें हें तत्त्वज्ञान पुरें करा. निदान सर्वसामान्य लोकाची दिशाभूल करण्याचें पाप तरी करूं नका. आतां काळ पालटला आहे. जग प्रगतीच्या मार्गानं पुढें पुढे जात आहे, नवसमाजनिर्मिति होऊं घातली आहे. प्रत्येक नागरिक कार्यक्षम कसा होईल, त्याचें आरोग्य चांगल्या उत्कृष्ट प्रकारचें कसें राहील, दारूच्या पायीं गरीब जनतेचे क्रोडों रुपये धुळीला मिळत आहेत-हें सारं थांबविण्यासाठीं साऱ्यांनीं दारूची पुरेपूर हकालपट्टी केली पाहिजे ! दारूबंदीची योजना यशस्वी केली पाहिजे.

"ज्या दारूनं साऱ्या राष्ट्राच्या आरोग्याची राखरांगोळी केली, असंख्य कुटुंबांना देशोधडीला लावलं, अनेक भगिनींच्या अब्रूचे धिंडवडे काढले, कोट्यवधि रुपयांचा चुराडा केला, जी माणसाला पशू बनविते, अशा

राक्षसीची हकालपट्टी आतां मुळापासून झाली पाहिजे (टाळ्या) आणि ती झाल्यानेंच लोकांचे प्रपंच सुखाचे होतील, भगिनींच्या अब्रूचे धिडवडे वाचतील, आणि तुमच्या घराचें गोकुळ होईल, साऱ्या संसारांत आनंदी-आनंद उत्पन्न होईल. महात्माजींची ही अपुरी राहिलेली मनीषा आपण आतां पूर्ण करून त्यांच्या स्वर्गस्थ आत्म्याला शांतीचा लाभ देऊं या, एवढें सांगून मी माझें भाषण संपवितों."

दारूबंदी ऑफिसर श्री. अनंतराव डोंगरे यांचें वरीलप्रमाणें कळकळीचे व मुद्देसूद भाषण चालू असता लोकसमुदाय अगदीं शांत व निश्चल होता. साऱ्या श्रोत्यांच्या अंतःकरणाचा त्या भाषणानें ठाव घेतला. भगिनी-वर्गानें तर भाषणाच्या समाप्तीनंतर कितीतरी वेळ टाळ्यांनीं सारा सभा-मंडप दुमदुमून सोडला. सुनंदा व रमाबाई यांनाहि मनापासून ते भाषण फार फार आवडलें आणि देवकीलाहि! त्यानंतर स्पेशल दारूबंदी ऑफिसर मि. दौलतराव याचें कांहीं वेळ भाषण झालें. तें शास्त्रशुद्ध व परिणाम-कारक होतें. पाश्चात्य राष्ट्रांत दारूच्या सेवनानें त्या समाजाची किती अधोगति झाली याचें वर्णन त्यांनीं आकडेवार जाहीर करून सांगितलें. अमेरिकेसारख्या सुधारलेल्या देशांत या दारूनें लोकांची नीतिमत्ता कशी धुळीला मिळविली आहे, अनेक गुन्हयाचें प्रमाण तिथें कसें वाढतीवर आहे, घटस्फोट आणि लग्नविच्छेद या गोष्टींना दारू हीच कशी कारणी-भूत होत आहे याचें सांगोपांग विवेचन त्यांनीं लोकासमोर केलें व दारूची मनुष्याला कांहींहि जरूर नाहीं, ते एक व्यसन आहे असें नुसतें म्हणून चालणार नाहीं, तर ते एक प्रकारचें विष आहे असें त्यांनीं ठासून सांगितलें. शेवटीं ते म्हणाले,

"दारूबंदीचा प्रयोग हा जागतिक दृष्टीनें अगदींच अभिनव नाहीं. या-पूर्वी अमेरिकेंत एके काळीं हा प्रयोग जारी केला होता. पण तो नंतर उठ-विला गेला. कॅनडांत तर अद्यापहि एका प्रांतांत दारूबंदी आहे. फिनलंड-मध्यें सन १९१९ पासून बरींच वर्षे दारूबंदी होती. दक्षिण आफ्रिकेंतहि कांहीं प्रमाणांत दारूबंदी जारी आहे. तसेंच आशिया खंडांतील कांहीं प्रदे-शांतहि अद्याप दारूबंदी आहे." एवढें सांगून त्यांनीं निरनिराळ्या देशांतील

कांहीं शास्त्रज्ञ लोकांचे दारूबद्दलचे अभिप्राय वाचून दाखविले. त्या साऱ्यांचा सारांश हाच होता कीं, ' दारू ही शरिराला केव्हांहि फायदेशीर नाहीं. तें एक विष आहे. '

जर्मनी, जपान, अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, बल्गेरिया, बेल्जम, आयर्लंड, इटली, पोलंड, स्वित्सर्लंड, तुर्कस्थान, राशीया, ग्रीस, रुमानिया वगैरे साऱ्याच देशांतील शास्त्रवेत्यांचें मत वरीलप्रमाणें असल्याचें त्यांनीं सभेंत वाचून दाखाविलें.

दौलतरावांच्या भाषणानंतर स्थानिक कार्यकर्त्यांनीं आणखी कोणास कांहीं शंका वगैरे विचारणें असल्यास विचारावी असें उभे राहून जाहीर केलें. कांहीं क्षण निःशब्द शांतता पसरली तिथं. सारं वातावरण भारून निघालं आणि क्षणार्धांत काय चमत्कार ? एक हाडकुळा इसम व्यास-पीठाच्या बाजूनं मार्ग काढीत द्रुतगतीनं येत होता. तो व्यासपीठावर येऊन दाखल झाला. चेहेरा शुष्क झालेला होता त्याचा. पण तरीहि त्याच्या चर्येवरचें तेज व निश्चयाची चमक हीं कांहीं औरच दृग्गोचर होत होतीं.

तो नीट उभा राहिला, त्यानं सभोवार एकदां दृष्टि फिरविली, अध्यक्षांना लवून नमस्कार केला व बोलायला सुरवात केली–

तो म्हणाला, " बंधूनो व भगिनींनो, आजच्या प्रसंगीं या ठिकाणीं व्यासपीठावरून दोन शब्द सांगावे अशी माझी लायकी नाहीं; परंतु आजचा हा दारूबंदीचा विषयच आमच्या कामगार बंधूंच्या फार जिव्हाळ्याचा असलेमुळें व दारूनं पोळून निघालेल्यांपैकीं मी एक असल्यामुळें या दारूच्या व्यसनानं सामान्य कुटुंबाची कशी वाताहत होते हे मी थोडक्यांत सांगणार आहें. बंधूंनो, या दारूनं आतांपावेतों आपल्या कामगार बंधुंचीं शेंकडों कुटुंबें धुळीला मिळविलीं आहेत. अनेकांच्या सोन्यासारख्या संसाराची राखरांगोळी केली आहे. पूर्वीं मी दारूला स्पर्श करीत नव्हतों तेव्हां माझी शरीरप्रकृति फारच दणकट व निकोप होती. घरांत बायकोजवळ सर्व पगाराचे पैसे मी देत असें. खाऊन पिऊन सुखानं माझा संसार चालला होता. परंतु दुर्दैवानं या बाटलाबाईच्या जाळ्यांत मी सापडलों व माझी अशी भिकाऱ्यासारखी दुःसह स्थिति झालेली आहे. अंगावर धड कपडा

नाहीं, घरांत खायला धान्याचा कण नाहीं, दोन दोन तीन तीन दिवस मी व माझी सुशील पत्नी उपाशी राहिलों आहोंत. पूर्वीचें कसदार शरीर जाऊन मी असा हाडांचा सापळा बनलों आहे. दारूबाज मित्रांच्या संगतीनं मी रात्रीच्या रात्रीं कुठंतरी गटारीमध्ये लोळतांना आढळत असे. माझ्या सोन्यासारख्या संसाराची वाताहत या दारूमुळं झाली आहे. मी नोकरीला मुकलों, शरिरानं शुष्क झालों; हें सर्व दारूमुळें हें लक्षांत ठेवा !

" माझ्याचसारख्या असंख्य बांधवांच्या संसाराची राखरांगोळी या दारूनं—या मदिराराक्षसीनं—करून टाकली आहे. आपल्या सुदैवानं आतां कॉंग्रेस सरकारनं या देशांत संपूर्ण दारूबंदी जाहीर केली आहे. मी आतां यापुढे दारूच्या थेंबालाहि स्पर्श करणार नाहीं अशी शपथ घेतली आहे आणि दारू सोडली तेव्हांपासून माझ्या छोट्याशा घरांत पूर्वीसारखं आनंदी वातावरण निर्माण झालं आहे. माझा संसार पूर्वीसारखाच सुखानं चालला आहे. दारूमुळें जो माझा मध्यंतरीं अधःपात झाला होता त्याबद्दल आतां मला फार फार पश्चात्ताप होत आहे. माझी माझ्या सर्व बांधवांना कळकळीची विनंति आहे कीं, तुम्ही यापुढें दारूच्या एका थेंबालाहि स्पर्श करूं नका, दारू हें नांवच अजिबात विसरा, दारूचा चोरटा व्यापार करणाऱ्यांना पोलिसाकडं पकडून द्या, आत्मशुद्धि करा...

" म्हणा सर्वजण, यापुढें दारू पिना...? हराम है !

" दारू पिना...? हराम है...!"

आणि असें बोलत त्याची नजर सहजगत्या स्त्रीसमुदायाकडं वळली. त्याची व देवकीची क्षणमात्र नजरानजर झाली. तिच्या चर्येवर अननुभूत आनंदाचा सागर ओसंडून निघाला होता. मंडपाच्या आवारांतील साऱ्याच भगिनी आनंदातिशयानं गहिंवरल्या होत्या. कित्येक दारुड्या नवऱ्यांच्या पत्नीहि होत्या त्यांत. बिचाऱ्या ' अभागिनी ' म्हणवून घेत आपल्याला. आपला उज्ज्वल भविष्यकाळ एवढ्या नाजिक येईल अशी बिचारींना कल्पना नव्हती;पण यक्षिणीची कांडी फिरवावी तसा चमत्कार दारूबंदीच्या कायद्यानं करून दाखविला होता.

मग साऱ्याजणी कॉंग्रेस सरकारला त्याबद्दल धन्यवाद देत राहिल्या.

त्यानंतर अबकारी खात्याचे मंत्रिमहाशय यांनीं दारुबंदीच्या धोरणाची पुढील रूपरेषा सर्वांना समजावून सांगितली; व या योजनेशीं सर्वांनीं सहकार्य करावें अशी विनंति केली व मग दारूच्या बनविलेल्या भुताच्या आकृतीला त्यांनीं स्वहस्तें अग्निसंस्कार केला. तें दारूचे भूत जळत असतांना त्यांनीं कांहीं क्षण मोठें तडफदार व भावनोद्दीपक असें भाषण केलें, व नंतर त्यांनीं म्हटलें, " हें दारूचें भूत आतां पंचमहाभूतांत विलिन झालें आहे " आणि त्या वेळीं सारं वातावरण टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटानं दुमदुमून उठलं व नंतरहि ' दारू पिना, हराम है !' हाच एक आवाज तिथं आसमंतांत राहून राहून कितीतरी वेळ घुमत राहिला.

———

## प्रकरण ९ वें



आज कितीतरी दिवसांनी प्रो. रंगरावाकडं त्यांचे सारे मित्र एकत्र जमले होते. आज मुद्दाम प्रो. दौलतरावांच्या अभिनंदनार्थ रंगरावांनीं सर्व मित्रांना चहापार्टीला बोलावलं होत. दौलतरावांनीं दारूचा नाद धरला व त्यापायीं त्यांची प्रोफेसरशिप गेली तेव्हांपासून ते सारे लंगोटीमित्र परपस्परांना दुरावले होते. दौलतरावांची नोकरी जाण्याला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष आपण कारणीभूत झालों असा आरोप स्वतः दौलतरावांकडून केला गेल्यानें रंगरावांच्याहि मनाला ती गोष्ट राहून राहून अस्वस्थ करीत होती. प्रो. रत्नपारखे, अॅडव्होकेट चंद्रराव, डॉक्टर रमानाथ किंवा रमणलाल शेट यांपैकीं कोणीच कधीं त्यानंतर एकत्र जमलें नाहीं. पण आज पुनश्च दौलतरावांच्या स्वतःच्या कर्तबगारीनें ते सारे एकत्र जमण्याचा योग जुळून आला होता.

त्यांच्यासारखा बुद्धिमान मोहोरा कायमचा निकामी न होतां परत आपल्या व्यासंगाचा व विद्वत्तेचा उपयोग जनताजनार्दनाच्या सेवेला करूं लागला याबद्दल आनंद व्यक्त करणकरतां आजचा खाजगी समारंभ रंगरावाकडं होणार होता.

प्रो. रत्नपारखे व रंगराव यांना कोणत्याहि विषयावर वादविवाद करण्याची फार संवय होती; आणि तीच संवय अगदीं पूर्वीपासून प्रामुख्यानं दौलतरावांनाहि होती. राजकारणांत एखादी खळबळजनक घटना घडली म्हणजे ते तिन्ही मित्र एकत्र जमून त्यावर सर्व प्रकारें चर्चा करीत. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या कामगिरीवरहि केव्हा केव्हा त्यांची चर्चा होई. पण त्या तिघांचें एक तत्त्व असें होते कीं, कोणत्याहि विषयाची अगदी मुळापासून चर्चा करावयाची म्हणजे तिघांनीं खास हजरच असले पाहिजे. जर त्यांपैकीं एखादा गैरहजर राहिला तर त्यांना ती चर्चा बेरंग वाटे; रंगच भरत नसे त्या वादविवादाला; मग विषय कसाहि महत्त्वाचा असो आणि या नियमाप्रमाणें मध्यंतरींच्या काळांत त्यांना दौलतराव कायमचे दुरावलेले. मग इतके दिवस थांबून राहिलेली वादविवादाची भूक त्यांनी आज यथेच्छ शमवून घेण्याचे ठरविलें असेल यांत नवल कसचें ?

प्रो. रंगरावाच्या दिवाणखान्यांत ते सारे आमंत्रित मित्र केव्हांच जमले होते. कुणी बुद्धीबळाचा डाव मांडला होता, तर कोणी सोंगट्या, पत्ते असा खेळ खेळण्यांत दंग झाले होते. ज्यांना खेळांत कांहीं गोडी वाटत नव्हती असे एक दोनजण टाईम्स वाचीत होते. दौलतराव येण्याचाच काय तो अवकाश होता.

आणि बरोबर पांच वाजतात तोंच तिथं दौलतरावहि येऊन हजर झाले. सर्वांनीं हसतमुखानं त्यांचं स्वागत केलं. त्यांच्या चेहेऱ्यावर पूर्वींचाच तजेला आला होता. नजरेंतील करारीपणाची चमक तेव्हाच साऱ्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली. पोषाख पूर्वींचाच मराठशाही परिधान केला होता त्यांनीं ! तें दृश्य पाहून एकादोघांना पूर्वीं जेव्हां प्रांतिक सरकारच्या दारूबंदीच्या धोरणावर तिथं चर्चा झाली होती, त्या प्रसंगाची आठवण झाली.

आणि योगायोगानं आजहि दारूबंदीच्या विषयावरच चर्चा होणार

होती; कारण दौलतराव आतां दारूबंदी ऑफिसर झालेले होते; मग काय विचारतां ?

" बरी लौकर सवड झाली हो दारूबंदी ऑफिसरसाहेबांना ! आम्हांला वाटलं आतां कसचे ओळखतां आम्हां गरीब मित्राना ! मोटारींतून दौरे, ठिकाठिकाणच्या सभा, तीं भाषणं ! एवढ्या रामरगाड्यांत मित्रांची आठवण येईल कशी ? " जयवंतराव म्हणाले.

" वा, वा ! असं कसं म्हणतां जयवंतराव ! उलट तुमच्या सर्वांच्या शुभ आशीर्वादानंच मी असा पूर्ववत सुधारलों. तुम्हा साऱ्या मित्रांना मी केव्हांहि विसरणे शक्य नाहीं. " दौलतराव नेकटॉयची चाळवाचाळव करीत म्हणाले,

" आतां कुठून आलांत मि. दौलतराव ? आजहि कोणाचं जाहीर व्याख्यान आहे कीं काय ? " अॅ. चंद्ररावांनीं मध्येंच प्रश्न केला.

" आतां मी करमणूक केंद्रावरूनच येत आहें. बहुतेक दोन तीन दिवसांनीं एका युक्तप्रांतीय तत्त्ववेत्त्याचे व्याख्यान होण्याचा योग येणार आहे. " दौलतराव म्हणाले.

" काय बरं त्याचं नांव ? " एकानें मध्येंच प्रश्न केला.

" पंडित विश्वदास ! मोठा विद्वान व बहुश्रुत माणूस आहे तो ! "

" फारच छान ! पण त्या दिवसाचं त्या बंगाली तत्त्ववेत्त्याचं भाषणहि मोठं मार्मिक व विचारपरिप्लुत असं झालं. " दे. भ. भवानराव म्हणाले.

" तें तर झालंच; पण स्वतः दौलतरावांचींहि चारदोन भाषणं मी ऐकलींत. स्तुति नाहीं करीत; मला तीं फार फार परिणामकारक वाटलीं. दौलतराव करीत असलेल्या बहुमोल कार्याचा गौरव परवांला खुद्द पंतप्रधानांनींहि बोलून व्यक्त केला. शाबास ! धन्य आहे तुमची ! " प्रो. रंगराव म्हणाले.

" यांत कसलं आलंय् धन्यता मानण्यासारखं ! मी स्वतः पूर्वी दारूच्या एका थेंबालाहि शिवत नव्हतों, हें तुम्ही सारे जाणतांच ! पण पुढें कालगतीनें माझी बुद्धी भ्रष्ट झाली व मी अट्टल दारुड्या बनलों. पण मग अशा कांहीं घटना माझ्या आयुष्यांत घडून आल्या कीं, माझ्या मनांत दारूचा

आतां पुरेपूर तिटकारा उत्पन्न झाला आहे. नुसता तिटकाराच उत्पन्न झाला असें नव्हे, तर तिची पाळेंमुळेंच खणून काढण्याच्या उद्योगाला मी लागलों आहें. आतां एकच ध्येय मी डोळयांपुढं ठेवलं आहे; तें म्हणजे या आपल्या देशांत पुढं दारूचा एक थेंबहि दिसूं द्यावयाचा नाहीं. व्यसनी माणसांचीं मनं शांततेच्या मार्गानं त्या दुष्ट व्यसनापासून परावृत्त करायचींत." एवढें बोलून दौलतराव सर्वांकडे निरखून पाहूं लागले.

"पण दौलतराव, याबद्दल माझी एक शंका आहे. दारू ही मनुष्ययोनी-इतकीच जुनी आहे. ती कधींहि नामशेष होणं शक्य नाहीं. पुरातन काळापासून पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली ही दारू आतां चुटकीसरशीं नाहींशी होईल हें म्हणणें मला तरी पटत नाहीं." मि. चंद्रशेखर यांनीं प्रश्न उपस्थित केला.

"हें पहा मि. चंद्रशेखर, तुमची ही शंका अगदींच निराधार व कुच-कामाची अशी आहे. सध्याच्या या मन्वंत कोणतीहि गोष्ट हातांत घेतली कीं, तिला तत्त्वज्ञानाची जोड करून देणारे महाभाग भेटतातच. तुमचें म्हणणेंहि त्या प्रकारचेंच आहे. हे म्हणणें मनाचा दुबळेपणा व्यक्त करणारें आहे. न्यूनगंड आहे तो! अशा खोटया युक्तिवादानं आम्ही 'दारू' चीं पाळेंमुळें खणून काढण्याचें सोडून देऊं असें कोणीहि समजणेचें कारण नाहीं." दौलतराव ठासून म्हणाले.

"माझ्या मतें दारूला 'व्यसन' हें नांव विनाकारणच दिलं गेलं आहे. सुखाची लज्जत वाढविण्याचें तें थोडकेंसें साधन आहे असं म्हणावं फार तर! पण तेवढ्याशा कारणानं तिचें कायमचें उच्चाटन करायला हवें, हें म्हणणें मला तरी सयुक्तिक दिसत नाहीं." नागू पाटील दारूची तरफदारी करीत म्हणाले.

"इथंच तुम्ही चुकतां आहांत पाटील! तुमच्यासारख्या सुखवस्तु लोकांनीं अशी दारूची मधूनच तरफदारी करावी व तिला चोरटा आश्रय द्यावा हें खरोखर निंद्य होय." दौलतराव नजर रोखीत म्हणाले.

"पण ह्याच्याहि पुढें जाऊन मी असें विचारतों कीं, दारूचें व्यसन घातकी आहे असें तरी कां म्हणावें? बरेच लोक असें म्हणणारे आढळतात

कीं, एकच प्याला घेतला म्हणजे त्यांत मनुष्य बुडालाच ! पण हें म्हणणेंहि माझ्या मतें चुकीचेंच आहे. मी हें कबूल करतों कीं, दारूमुळें कांहीं लोकांच्या आयुष्याचा होम झाला आहे. पण हा ऱ्हास दारूपेक्षां ती पिणाऱ्यांच्या स्वभावांतील कमकुवतपणामुळेंच झाला आहे. अतिशय सुसंस्कृत असे कांही मित्र एकत्र बसले आहेत आणि तिथं जॉनी वॉकरच्या बाटल्या सोड्यामधून पिणं चाललं आहे, बाजूला मसालेदार सुग्रास अन्न तयार होत आहे, बागेतील सुमधुर वासाची झुळूक मन उल्हसित करीत आहे; मग अशा वेळीं थोडशी घेतली...मजा केली, तर त्यांत बिघडलं कुठं ?" महादूशेट भिकुसा छाप पुडा खिशांतून काढत म्हणाले.

" हेंच तें अधोगतीचें कारण ! हेच ते व्यसनाचें समर्थन करणारे घातकी विचार ! या असल्या विचारांनींच मी या दारूच्या जाळ्यांत सांपडून पुरेपूर होरपळून निघालों. प्रथमदर्शनीं मनाची समजूत घालायला हें म्हणणें बरें दिसतें; पण या साळसूद विचारांच्या बुरख्याखालींच अनेक खानदानी व सुखवस्तु कुटुंबें नामशेष झाल्याचीं उदाहरणें दाखवितां येतील. तेव्हां हें दारूचें तरफदारी करणारें तत्त्व प्रत्यक्ष परिणामीं किती घातक ठरतें याची खात्री मीच करून द्यावयास पाहिजे असे नाहीं. " दौलतराव म्हणाले.

इतक्यांत उपहाराची सर्व सिद्धता झाल्याची वर्दी आंतून आलेमुळें सर्वजण उठून आंतमध्यें मुद्दाम सजविलेल्या दिवाणखान्यांत जाऊन बसले. आजच्या पार्टीतून मद्याची कायमची इकालपट्टी झाली होती. निर-निराळ्या जातींचीं फळें व सरबतें यांचाच तींत उपयोग केला होता. तो कार्यक्रम चालू असतांना अनेक मित्रांनीं दौलतरावांना दारूबंदीबद्दल कांहीं शंका विचारल्या व त्या सर्वांचीं उत्तरें त्यांनीं समर्पक अशीं दिलीं आणि सर्वांचा ग्रह दारूबंदी कार्याबद्दल अनुकूल केला.

नंतर प्रो. रंगरावांचें दौलतरावांच्या अभिनंदनार्थ छोटेंसें भाषण झालें. सर्वांनीं टाळ्या देऊन व थ्री चीअर्स देऊन त्यांच्या कार्याचा गौरव केला.

सर्व मित्रमंडळी घरोघर निघून गेल्यावर प्रो. रंगरावांनीं दौलतरावांना विनोदानें विचारलें,

" दौलती, माझ्यावरचा तुझा पूर्वीचा राग गेला ना ? "

" छे ! छे ! प्रियमित्रा ! तुझ्यावर कसचा माझा राग ? उलट तुझ्या म्हणण्याचाच माझ्या मनावर त्या वेळीं चांगला परिणाम झाला व माझी चूक मला कळून आली. तुझ्या मनासारखें खंबीर मन माझें नव्हतें. आता मी खरोखर तुला माझा उपकारकर्ता समजतों. तूं त्या वेळीं मला तुझ्या घरून घालवून लावलंस तेंच फार बरं केलंस. दुसरा एकादा दुष्ट विचारांचा मित्र असतां तर त्यानें माझ्या कमकुवत मनाचा फायदा घेऊन माझी इस्टेट, माझं कुलशील धुळीला मिळवून मला अधोगतीच्या खोल गर्तेत लोटून दिलं असतं; पण तूं तसं केलं नाहींस. तुझ्यासारखं खंबीर मन माझं कां नसावं ? हा एकच प्रश्न मी माझ्या दुबळ्या मनाला पुन्हा पुन्हा विचारीत असें. मग विचारांची मालिका शेवटपावेतों ताणल्यावर मला कळून येत असे कीं, चूक माझीच आहे. मग माझ्या ओढाळ मनाला मी चांगला काटेदार लगाम घातला अन मग साऱ्या गोष्टी अनुकूल अशा जुळून आल्या व मी या दुष्ट व्यसनापासून कायमचा परावृत्त झालों. "

" आतां सुनंदा वहिनींना व अशोकला घेऊन ये ना इकडं ! "

" होय तर ! आज पाठवतोंच त्यांना ! "

असें म्हणत दौलतराव रंगरावांचा निरोप घेऊन घरीं जायला निघाले. घरीं पोहोचल्यावर सुनंदा काय करते हें पाहाण्याकरतां त्यांनीं पाय न वाजवितां हळूच दारांतून डोकावून पाहिलं.

टेबलावर कांहीं पत्रें नुकतींच येऊन पडलीं होतीं. त्यांतील एक पत्र वाचण्यांत ती गढून गेली होती.

" काय आहे तें सुनू ? कोणाचें पत्र ? " त्यांनीं तिच्या रोखानं जात प्रश्न केला.

" इश्य ! केवढ्यानं दचकलें मी ! येतांना पाय सुद्धां नाहीं वाजलेत ते ! कॉलेजकडचं पत्र आहे तें. आपल्याला परत प्रोफेसरशिप देण्याचा निर्णय कॉलेजच्या बोर्डानं एकमतानें पास केला आहे ! " ती म्हणाली.

" केला असेल ! परंतु आतां प्रोफेसर होणं मला नाहीं पसंत ! "

" मग ? "

" दारूबंदी ऑफिसर ! हेंच कार्य मी शेवटपावेतों करणार ! आणि

माझा हा निश्चय मी केव्हांहि बदलणार नाहीं. पसंत आहे ना तुला हा माझा निश्चय ? " त्यांनीं तिला विचारलं.

आणि त्यांच्या करारी नजरेला आपली स्नेहार्द्र नजर भिडवीत तिनें म्हटलं, " पसंत ! अगदीं पसंत ! ! "

* * *

सोनाजीला मिलमध्यें पूर्वीप्रमाणें कामावर घेतलं होतं. लौकरच स्वतःच्या अंगच्या हुषारीनं तो पुन्हा ' जॉबर ' झाला आणि चालू महिन्यांत त्याला एक महिन्याचा जादा पगार ' बोनस ' म्हणूनहि मिळाला होता.

आज बोनसची रक्कम रुपये दीडशें त्याच्या हातांत पडली होती. आज त्याचा चेहेरा आनंदानं पुरेपुर फुलून निघाला होता. दारू सुटल्यापासून देवकीला त्यानं एका शब्दानेंहि दुखविलं नव्हतं. त्यानें स्वतः तर दारू सोडली होतीच; पण त्याच्या कायमच्या दारूड्या मित्रांनाहि त्यानें दारू सोडावयास लावली होती. त्या दिवसाच्या त्यानं केलेल्या जाहीर भाषणानंतर तो साऱ्या गिरणी कामगारांचा फार आवडता झाला होता. कित्येकांची दारू त्यानं सोडविली होती. कांहींजण चोरट्या रीतीनं दारूची विक्री करीत, तेहि प्रकार त्यानं बंद करवले होते. साऱ्यांना तो सुटीच्या दिवशीं करमणूक केंद्रावर घेऊन जाई. नंतर तर त्याच्या उपदेशाचा इतका उत्कृष्ट परिणाम झाला कीं, आतां एकहि मजूर दारू पिणारा असा त्या भागांत शिल्लक राहिला नव्हता.

दारूचा अशा रीतीनं त्या कामगारांच्या चाळींतून पुरताच बीमोड झाल्यानें त्यांचीं घरें आनंदानें गजबजून उठलीं. स्त्रियांच्या अंगावर चांगले कपडे दिसूं लागले. बालगोपाल मंडळी आनंदानं नाचूंबागडूं लागलीं आहेत असा देखावा घराघरांतून दिसूं लागला. भगिनींचे चेहेरे आनंदानं टवटवलेले पाहून प्रत्येकाचं मन आनंदानं उचंबळून येई.

दूधवाला, भाजीवाला, फेरीवाला, बांगड्यावाला या साऱ्यांची नित्य वर्दळ तिथं सुरू झाली. संसारोपयोगी वस्तू खरीदण्यांत भगिनी दंग होऊन गेल्या. मुलांना पाटीपुस्तकें मिळालीं व शेजारची मोडकळीस येऊं घात- लेली म्युनिसिपॅलिटीची शाळा गजबजून उठली. कोणत्याहि घरांत ना कधीं

भांडण कीं तंटा! माणसंहि परस्पर सहकार्यानं वागूं लागलीं होतीं. साऱ्यांनीं जणूं काय, आपापल्या अंतःकरणाची पुरीच शुद्धी केली होती. त्यांचीं हाडकुळीं शरीरें आतां चांगलीं तजेलदार दिसूं लागलीं होतीं आणि सारेजण याचें श्रेय कॉंग्रेससरकारच्या दारूबंदीच्या कार्याला देत होते.

आज सोनाजीप्रमाणेंच इतर साऱ्या कामगारांना कमीअधिक प्रमाणांत बोनस मिळाले होते. सोनाजीनं आज बोनसची रक्कम एका निराळ्याच कारणांत खर्च केली होती.

* * *

" इश्य! हें काय? केव्हां यायचं झाउं तें कळलं बी नाय!" टेवकी फळीवर घासलेलीं भांडीं ठेवीत सोनाजीकडं पहात म्हणाली.

" अग, आज असंच अकस्मात येऊन तुला आश्चर्यचकित करायचं ठरवलं होतं मनांत!" डोकीची टोपी खुंटीवर ठेवीत तो म्हणाला.

" तें कसं काय? आणि हे काय आणलं आहे हातांत?" तिनं मोठ्या औत्सुक्यानं त्याच्याजवळ जात विचारलं.

" हो! तेंच तर आहे गुपीत! ओळख पाहूं काय आणलें तें?" तिला जवळ घेत तो म्हणाला.

" अय्या! सोडा मला! वाईच् कोनी पाहील ना?" ती स्वतःला सोडवून घेत म्हणाली.

" ही पहा, केव्हांपासून आणीन, आणीन असं माझ्या मनांत फारा दिवसांपासून होतं,ती आज आणलीय् मी माझ्या राणीकरतां! बोनस मिळालं आज मला!" तिच्या हातांत आपण आणलेली मखमली पेटी देत तो म्हणाला.

" ओहो! सोन्याची मोहनमाळ!" पेटी उघडून निरखून पहात ती म्हणाली.

—आणि मग तिच्या आनंदानं बेहोष झालेल्या मुखकमलावर आपले ओठ टेकण्याचा मोह सोनाजीला आवरला गेला नसल्यास नवल कोणतें!

# सुरसग्रंथमाला ( पंढरपूर )

फक्त एक रुपया प्रवेशफी भरून कायमचे वर्गणीदार होतां येते.

*खालील पुस्तकें आमचे ग्राहकांस ¾ किंमतीस मिळतील. ट.ख. वेगळा.

| नांव | | रु. आ. पै |
|---|---|---|
| जर्मन मोहीम<br>गहनगूढ<br>प्रेमपरीक्षण | ... ... ... | २-१०-० |
| सत्यमेव जयते व शैशव सहचरी | ... ... | २-०-० |
| पितृप्रेम ( नाटक )—परांजपे | ... ... | ०-१०-० |
| दैवदुर्विपाक व भयंकर भूल—सव्यसाची | ... | ३-४-० |
| मृगेंद्रलीला—प्रभंजन | ... ... ... | ३-१२-० |
| ईश्वरी लीला व आशानिराशा—नरवणे | ... | ३-१२-० |
| प्रेमाश्रम, भाग १।२—प्रभाकर | ... ... | ७-०-० |
| वीरात्मा, भाग १।२—गणेशशास्त्री फाटक | ... | ७-०-० |
| विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार | ... | ३-८-० |
| कुमार अशोक—लिमये | ... ... ... | ३-४-० |
| जगाचा बाजार, भाग १।२।३ एकत्र | ... ... | ९-८-० |
| ढोंगी गुरूच्या सैतानी लीला—गणेशशास्त्री फाटक | ... | ३-८-० |
| हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी | ... | ३-८-० |
| भाईबंद व नराचा नारायण—दातार | ... ... | ३-४-० |
| प्रेमबंधन—दातार | ... ... ... | ३-८-० |
| प्रतापादित्य—वा. शि. हडकर | ... ... | ३-८-० |
| दैवी कल्याणी—अज्ञात | ... ... ... | ३-८-० |
| भीषण सूड—अज्ञात | ... ... ... | ३-४-० |
| अमृत कीं विष—हडकर | ... ... ... | ३-४-० |
| रत्नगडची रंभा—सहृदय | ... ... ... | ३-४-० |
| रक्ताचें गालबोट—परांजपे | ... ... ... | ३-४-० |

कुटुंबांगे

लोग अनेक




लेकिन पसंदगी अेक !

मोती हेअर ऑईल

मोती प्रॉडक्टस्-
सोलापूर

पॅरेमाउट लि